# शिवचरित्र कार्यालयाचे शिवचरित्रविषयक ग्रंथ

ह्या तीनहि ग्रंथांत इंग्रजी, डच, पोर्तुगीज, फारसी तसेंच संस्कृत, कानडी, हिंदी ह्या
भाषांतील श. १३४८ ते श. १६०४ (इ. १६८२ एप्रील) अखेरपर्यंत पत्रांचा
राजकीयदृष्ट्या विस्तृतपणें मराठींत काढलेला सारांश दिलेला आहे. अर्थातच मराठी
पत्रें ह्यांत घेतलेलीं आहेत हें सांगणें नको. इ. १६३७ पर्यंत जेवढीं ह्या ७/८ भाषां-
मधून इतस्ततः पत्रें म्हणून प्रसिद्ध झालीं त्यांचा सारांश कालानुक्रमानें ह्या भागांतून
प्रसिद्ध झाला आहे. पत्रें व तीं कालानुक्रमानें लावलेलीं असणें ह्याहून इतिहासअभ्या-
सकास दुसरी महत्त्वाची गोष्ट नाहीं. अशीं पत्रें ह्या तिन्ही भागांत अंदाजें तीन सहस्र
आलीं आहेत. शिवाय तिसऱ्या भागांत अकबर, जहांगीर, शहाजहान, औरंगजेब ह्या
बादशहाच्या कारकीर्दीचीं **जुलूस-वर्षें** म्हणजे त्यांच्या कारकीर्दीच्या प्रत्येक वर्षाचा
प्रारंभकाल मुसलमानी व इंग्रजी वर्ष, महिना, तारीख असा दिला आहे. ह्या सर्वांपेक्षां
**शिवकालीन शकावली**-पृष्ठें सुमारें १५० दिली आहे. पृष्ठसंख्या ९७०. किं.
भाग १, २; प्रत्येकी रु. ३॥, भाग ३ रु. २॥.

**शिवचरित्र निबंधावली**—ह्या ग्रंथांत श्री. द. वि. आपटे, प्रो. पटवर्धन, प्रो.
कुंभारे, प्रो. देशपांडे, प्रो. ओतुरकर, श्री. दि. वि. काळे, श्री. शं. ना. जोशी, श्री.
वा. सि. बेंद्रे, रा. सा. गं. के. देशपांडे ह्यांचे मुख्यतः तत्कालीन पत्रांचे आधारें
शिवचरित्रांतील प्रसंगावर लिहिलेले निबंध आले आहेत. पृ. ४१२, किं रु. ३॥

**शिवाजी निबंधावली भाग १**—ह्या ग्रंथांत प्रो. काणे, प्रो. पेंडसे, श्री.
रा. राजोपाध्ये, प्रो. सबनीस, श्री. य. खु. देशपांडे, श्री. बा. आ. देशप्रभू पेडणेकर, ... पुणतांबेकर,
श्री. ज. स. करंदीकर, म. म ... र्म गागाभट्ट
श्री. भट, श्री. शि. का. ओक ... न्मदिनानिर्णय,
शिवाजीची कौटुंबिक माहिती ... कालीन सिंहस्थ
श्रीसमर्थ रामदास, शिवकाल ... आहेत. पृ.
निजामशाही व आदेलशाही ...
३००, किं. रु. ३॥

**शिवाजी निबंध** ... नामा, द्वा. वि.
गोखले-शिवकालीन प्र ... ीन भाषा, प्रो.
देशपांडे-मोडी लिपी, ... याद्या, मराठे
व रजपूत; श्री. ग. ह. ख ... कर शिद्दी, श्री.
मा. ह. घोरपडे-शिवाज ... , पवार-शिव-
कालीन ज्योतिर्गणित; ... समाज स्थिति;
प्रो. पोतदार-अणाजी ... (मोहत्तो)-
'आमामी ए साधन व ... )-शिवाजीची
दक्षिणेकडील स्वारीची ... र्णनहि मराठी
सत्तेचा उदय, प्रो राम ... नवीन साधनें,
प्रो. वर्मा-महमदनामा ...

# निवेदन

'त्रैमासिकाचा प्रस्तुत अंक मंडळांत वेळोवेळीं वाचल्या गेलेल्या निबंधांचा सं( दुसरा म्हणून करण्यांत आला आहे. निबंधांचे मराठी व इंग्रजी असे दोन विभा( करण्यांत आले असून प्राचीन साधनांना प्रामुख्य दिलेलें आढळून येईल.

मराठी निबंधांत प्राध्यापक वा. वि. मिराशी ह्यांनीं सातारा जिल्ह्यांत चवथ्य पांचव्या शतकाचे प्रारंभीं राष्ट्रकूटांची एक स्वतंत्र शाखा "मानपूरचे राष्ट्रकूट' म्हणून ३–४ शतकांपर्यंत राज्य करीत होती असा नवीनच पुरावा साधार दिल आहे. तसेंच वऱ्हाडांत नांदगांव येथें यादव कृष्ण याचा एक नवीन शिलालेख त्यांन आढळून आला याचेंही वाचन दिलें आहे. श्रीमंत आबासाहेब मुजुमदार यांन पेशवाईतील दोन शिलालेख अहमदनगर जवळ हिंगणगांव येथें मिळाले त्यांचेंही वाचन येथें प्रथमच प्रसिद्ध करण्यांत आलें आहे.

श्री. चितळे ह्यांचा पुरंदरच्या कोळ्यांवरील निबंध महत्त्वाचा आहे. त्यांनीं ह्य प्रकरणाचें समालोचन तर केलेंच आहे; परंतु दोन नवीन पत्रें उजेडांत आणून य विषयावरील विचारास नवीन चालना दिली आहे. केवळ साहित्य म्हणून नुसतीं पत्रें छापण्यापेक्षां अशा तऱ्हेचा एकेक प्रकरणवार घेतलेला आढावा वाचकांस अधिक रुचेल असा विश्वास वाटतो.

गांवगाडा हें प्रकरण त्यांतील हक्कांच्या शाश्वतीच्या दृष्टीनें अधिक गुंतागुंतीचें व समाजव्यवस्थेबरोबर बदलणारें आहे. 'चौगुला' वतनासंबंधींच्या आपल्या विस्तृत लेखांत मंडळांतील संशोधक श्री. शंकरराव जोशी ह्यांनीं कागदपत्रांचे आधारें ह्य वतनासंबंधीचे हक्क कोणते याची चर्चा केली आहे.

इंग्रजी लेखांत प्राध्यापक गोडे यांनीं "चष्म्याचा इतिहास" ह्या अभिनव विषया-वर निबंध लिहून इ. स. १५०० ते १८०० ह्या काळांतले अनेक उल्लेख दाखवून दिले आहेत. संयुक्त प्रांतांत सुमारे २५ वर्षांपूर्वी ग्रामीण उद्योगधंद्याची पहाणी करण्यांत आली होती त्यावेळीं कित्येक ठिकाणीं स्फटिकाचे दगडापासून चष्म्याच्या कांचा तयार करणारे देशी कारागीर आढळून आले होते व कमीअधिक प्रमाणांत हा धंदा अजूनही तिकडे चालतो. अर्थात् विलायती कांचांच्या आयातीमुळें व सूक्ष्मतेची जोड नसल्यामुळें आतां हा धंदा बहुतेक बसून गेल्यासारखाच आहे.

श्री. य. रा. गुप्ते ह्यांनीं छत्रपतींच्या मुद्रेविषयींच्या आपल्या लेखांत सभासद बखरीच्या एका प्रतींतील उल्लेखावरून श्रीशिवछत्रपतींच्या राज्यारोहण प्रसंगीं कवींद्र

परमानंद ह्यांनीं रचलेला एक श्लोक आपल्या मुद्रेसाठीं उपयोजिला होता असा नवीनच मुद्दा उपस्थित केला आहे. तूर्त अशी मुद्रा असलेला एकही कागद संशोधकांपुढें नाहीं. परंतु अज्ञात माहिती उजेडांत घेऊन संशोधकांना त्याचा उपयोग व्हावा. ह्याच हेतू हा लेख छापण्यांत आहे. अधिक शोध व्हावयास पाहिजे हेंच खरें !

इंदूर म्युझियमचे क्यूरेटर श्री. डिसकळकर ह्यांचा होळकरी नाण्यांवरचा लेख महत्त्वपूर्ण आहे. जुन्या ज्ञात नाण्यांचा परामर्ष घेऊन त्यांनीं एकदोन **नवीन नाणींही** ह्या लेखांत समाविष्ट केलीं आहेत. नाण्यांवरील लेखांत त्यांचीं प्रतिमापत्रें देणें अत्यावश्यक असतें परंतु हीं प्रतिमापत्रें हातीं न आल्यामुळें देण्याचें जमलें नाहीं.

कोल्हापूरचे प्रिन्सिपॉल डॉ. अप्पासाहेब पवार ह्यांनीं रामचंद्रपंत अमात्यांच्या आयुष्यांतील एका प्रसंगावर कागदपत्रांचा फेरविचार करून कांहीं विचार नव्यानेंच पुढें मांडले आहेत.

याप्रमाणें विविध विषयांवरील जुनें नवें साहित्य या खंडांत ग्रथित केलें आहे. ह्या साहित्याचा उपयोग संशोधकांस खचित होईल असा भरंवसा वाटतो. मंडळाचे संग्रहीं अजून जीं अमोलिक साधनें पडून आहेत त्यांतून अशाच प्रकारचे एकदोन खंड सहज काढतां येतील अशी उमेद वाटते. अडचण फक्त आर्थिक परिस्थितीसंबंधीं व सध्यांच्या मुद्रणनियंत्रणासंबंधीं आहे.

---

ऐतिहासिक संकीर्ण निबंध खंड २

# अनुक्रमणिका



## १ मानपूरचे राष्ट्रकूट

[ महामहोपाध्याय प्रिन्सिपाल वा. वि. मिराशी, उमरावती ]

**बदामीच्या*** **चालुक्यांच्या** राजवटीनंतर ज्याचें साम्राज्य महाराष्ट्रांत प्रस्थापित झालें तें **राष्ट्रकूट** घराणें इतिहासांत सुविख्यात आहे. याचे कोरीव लेख इ. स. च्या आठव्या शतकापासूनचे सांपडले आहेत. पण हें घराणें त्या शतकांतच प्रथम उदयास आलें किंवा त्याआधींही त्याची पूर्वपीठिका सांपडते हा प्रश्न अद्यापि अनिर्णीतच आहे. अलीकडे सांपडलेल्या कांहीं कोरीव लेखांवरून या प्रश्नावर प्रकाश पाडण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखांत केला आहे.

आतांपर्यंत या पूर्व–राष्ट्रकूटवंशाचे ( Early Rashṭrakūṭa Dynasty ) तीन ताम्रपट सांपडले आहेत. त्यांपैकीं पहिला डॉ. भाऊ दाजी यांच्या संग्रहांत होता. तो भगवानलाल इंद्रजी यांनीं रॉयल् एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या जर्नल्मध्यें ( पृ. १६, पु. ८८ इ. ) प्रकाशित केला आहे. त्यांत या वंशाला **राष्ट्रकूट** म्हटलें आहे. हा ताम्रपट मूळचा कोठला याविषयीं माहिती मिळत नाहीं. तथापि त्यांत **अभिमन्यु** नामक राजानें **उंडिकवाटिका** हा गांव, दान दिल्याचें नमूद असल्यानें त्याला ' उंडिकवाटिका ताम्रपट ' म्हणतात. दुसरा ताम्रपट कोल्हापूरजवळच्या एका खेड्यांत सांपडला; तो कोल्हापूरचे प्रो. कुंदनगार यांचे मार्फत म्हैसूर संस्थानच्या पुराणवस्तु संशोधन खात्याचे प्रमुख डॉ. कृष्ण यांचेकडे गेला व तो त्यांनीं आपल्या खात्याच्या सन १९२९ च्या वार्षिक रिपोर्टांत ( पृ. १९७ इ ) त्याच्या छापांसहित प्रकाशित केला आहे. या ताम्रपटांत **पांडरंगपल्ली** नामक गांव **अविधेय** नामक राजानें दिल्याचा उल्लेख आहे म्हणून त्याला पाण्डरंगपल्ली ताम्रपट नांव मिळालें आहे. तिसरा ताम्रपट पोर्तुगाल गोव्यांतील सिरोदा या गांवीं सांपडला आहे; तो रा. ब. कृष्णमाचार्लू यांनीं एपिग्राफिया इंडिका ( पु. २४, पृ. १४३ इ. ) मध्यें प्रसिद्ध केला आहे यांत **देवराज** नामक राजानें कांहीं गांव दिल्याचा निर्देश आहे. प्राप्तिस्थानावरून यास सिरोदा ताम्रपट म्हणतात. या तीन ताम्रपटांवरून आपणांस या राजाची खालील वंशावळ तयार करतां येते–

---

* संमेलन ३१ वें. श. १८६६–१९४४.




**उंडिकवाटिका** ताम्रपटांत या वंशाला राष्ट्रकूट असें स्पष्ट म्हटलें आहे. **पांडरंगपल्ली** ताम्रपटांत या वंशाचें नांव आलें नाहीं. सिरोदा ताम्रपटांत '**चंद्रपुराद् गोमिनां देवराजवचनात्**' असा आरंभींच निर्देश आला आहे. याचे दोन अर्थ संभवतात. 'गोमिनां याचा संबंध 'चंद्रपुरात्' याशीं लावल्यास गोमींच्या चंद्रपुराहून असा अर्थ होईल; 'देवराजवचनात्' याच्याशीं तें पद जोडलें तर देवराज हा गोमिवंशांत उत्पन्न झाला होता असा अर्थ निघेल. हा सिरोदा ताम्रपट सर्वांत अगोदरचा असल्यानें त्यावेळीं या वंशाचें नांव '**गोमिन्**' असून पुढें तें **राष्ट्रकूट** झालें असण्याचाही संभव आहे. राष्ट्रकूटांच्या कांहीं ताम्रपटांत त्या वंशाचें '**तुङ्ग**' असें नांव आलें आहे. 'गोमिन्' व 'तुङ्ग' या दोन्ही नांवांचा अर्थ 'पूज्य', 'महनीय' असा होतो. तें कसेंही असलें तरी देवराज नृपतीच्या तीनही ताम्रपटांतील वर्णनांत विशिष्ट साम्य असल्यानें तो **राष्ट्रकूट** वंशांतील होता यांत संशय नाहीं.

या ताम्रपटांत कोणत्याही शकाचा उपयोग केलेला नाहीं. दोन ताम्रपटांत त्या त्या राजांच्या राज्यारंभापासूनचीं वर्षें दिलीं आहेत. तिसऱ्या ताम्रपटांत तर तसाही निर्देश नाहीं. त्यामुळें या राजांचा काळ ताम्रपटांच्या अक्षरवटिकेवरून ठरविला पाहिजे. तीनही ताम्रपटांच्या संपादकांच्या मतें या ताम्रपटांचा काळ चौथे–पांचवें शतक हा असावा.

आतां हे राजे कोठें राज्य करीत होते याचा विचार करूं. डॉ. भाऊ दाजींना उंडिकवाटिका ताम्रपट नक्की कोठें मिळाला तें माहीत नाहीं; पण तो मुंबई प्रांतांतच कोठेंतरी सांपडला असावा. इतर दोन ताम्रपट तर कोल्हापूर संस्थान व गोवें प्रांत यांत मिळाले आहेत. यामुळें हें घराणें **दक्षिण महाराष्ट्रांत** राज्य करीत होतें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. पाण्डरंगपल्ली ताम्रपटांत या वंशाचा मूळ पुरुष **मानाङ्क** याला '**श्रीमत्कुन्तलानां प्रशासिता**' असें म्हटलें आहे. डॉ. कृष्ण यांनी या ठिकाणीं 'सात्कुन्त धरा नः प्र ई सिता' असें कांहींतरी वाचून व सात्कुन्त

* देवराजाच्या ह्या आजवर अज्ञात असलेल्या थोरल्या पुत्राचें नांव आतां ज्ञात झालें आहे. तें नांव माणराज=विभुराज हें होय. पहा–डॉ. मो. गं. दीक्षित संपादित 'महाराष्ट्रांतील कांहीं प्राचीन ताम्रपट व शिलालेख' भा. इ. सं. मं. स्वी. ग्रं. क्र. ६७ पृ.५-६

म्हणजे सातपुडा असा शोध लावून हें घराणें वऱ्हाड—मध्यप्रांतांत राज्य करीत होतें असें म्हटलें आहे, तें चूक आहे. वर दिलेल्या शुद्ध वाचनावरून **मानाङ्क** हा **कुन्तल** देशावर राज्य करीत होता. यांत संशय नाहीं. कुन्तल देशांत **कृष्णा नदीचें** खोरें व त्याच्या दक्षिणेचा **कर्नाटक** प्रदेश याचा समावेश होत असे. 'विख्यातकृष्णवर्णे तैलस्नेहोपलब्धसरलत्वे । कुन्तलविषये नितरां विराजते मल्लिकामोदः ॥ ' हा उत्तर चालुक्यांच्या नीलगुंद ताम्रपटांत तैलपाचा नातु **जयसिंह** ऊर्फ **मल्लिकामोद** याविषयीं आलेला श्लेषपूर्ण सुंदर श्लोक पहा. यांत कुन्तलदेशांत **कृष्णवर्णा** किंवा **कृष्णा** ही प्रसिद्ध नदी वाहते, असा स्पष्ट निर्देश आहे. पाण्डरंगपल्ली ताम्रपटांत अने नदीच्या तीरावर **काम्यक** व **जावल** या वाड्यांसहित **पांडरंगपल्ली** गांव दिला असल्याचा निर्देश आहे. डॉ. कृष्ण यांना नदीचें नांव व गांवांचीं नांवें बरोबर रीतीनें वाचतां आलीं नाहींत. यांतील **अने** नदी ही कृष्णा नदीस मिळणारी **येण्णा** किंवा **वेणा** नदी असावी. **जावल** तर **जावळीचें** प्राचीन रूप दिसतें. **काम्यक** गांव जवळपास सांपडतें काय पाहिलें पाहिजे. तथापि एवढ्या निर्देशावरून **सातारा** जिल्हा राष्ट्रकूट नृपति मानाङ्काच्या राज्यांत अन्तर्भूत होता हें दिसून येईल.

उंडिकावाटिका ताम्रपटांत मानाङ्काचा पणतू **अभिमन्यु** हा **मानपुरीं** असतांना त्यानें तें दान केलें असें म्हटलें आहे. हें **मानपुर मानाङ्क** राजानें आपल्या नांवें स्थापून राजधानी केलेलें दिसतें व तें कित्येक पिढ्या या वंशाची राजधानी होतें. त्यामुळें या राष्ट्रकूटांस **मानपूरचे राष्ट्रकूट** म्हणण्यास हरकत नाहीं. हें **मानपुर** सातारा जिल्ह्यांतील **माणगंगा** नदीच्या तीरावरील **माण-गांव** असावें. या ताम्रपटांत **अभिमन्यु** राजानें **पेठपंगरकच्या 'दक्षिण शिव'** देवास **उंडिकवाटिका** गांव दिल्याचा निर्देश आहे. डॉ. फ्लीटनें हें दक्षिण शिवाचें देवालय मध्यप्रांताच्या होशंगाबाद जिल्ह्यांतील महादेव-पर्वतराजीवरील प्राचीन देवालय असावें असें म्हटलें होतें, पण तेंही बरोबर दिसत नाहीं. या ताम्रपटाचें नक्की प्राप्तिस्थान माहीत नसल्यानें डॉ. फ्लीटला त्यांत निर्दिष्ट केलेल्या स्थळांचा बरोबर पत्ता लागला नव्हता. महादेवाच्या देवळाकरितां इतकें दूर जावयास नको. सातारा जिल्ह्यांत सह्याद्रीच्या शिखरांवर अनेक ठिकाणीं प्राचीन काळापासून पवित्र गणलेलीं शिवालयें आहेत. त्यांपैकींच हें एक असावें. **पेठ पंगरकाचा** नक्की पत्ता अद्यापि लागला नाहीं.

शिरोदा ताम्रपटांत जीं गांवें निर्दिष्ट केलीं आहेत तीं **गोवेंसाष्टी** या भागांत सांपडतांत असें त्या ताम्रपटाच्या संपादकांचें ह्मणणें आहे.

वरील विवेचनावरून हा प्राचीन राष्ट्रकूट वंश इ. स. च्या चौथ्या शतकांत **सातारा** जिल्ह्यांतील **मानपूर** या गांवीं राज्य करीत होता. त्याच्या अंमलाखालीं **दक्षिणकोंकण** व कृष्णा नदीच्या दक्षिणेचा **महाराष्ट्र** व **कर्णाटक** प्रांत हा

मुलूख होता व त्याला **कुन्तलाधिपति** ह्मणत असत हें दिसून येईल. आतां या वंशाविषयीं आणखी काय माहिती मिळते तें पाहूं.

इ. स. च्या चौथ्या पांचव्या शतकांत **उत्तर कोंकण, दक्षिण गुजराथ** व **उत्तर महाराष्ट्र** या प्रांतांत प्रथम **आभीर** व नंतर **त्रैकूटक** वंशाचें राज्य होतें. **विदर्भप्रांत वाकाटकांच्या** अंमलाखालीं होता. वाकाटक साम्राज्याचा संस्थापक प्रथम **प्रवरसेन** याच्या अंमलाखालीं **नर्मदा** व **तुंगभद्रा** या नद्यांमधील दक्षिण हिंदुस्थानांतील मध्यभागचा विस्तृत प्रदेश होता असें दिसतें. प्रवरसेनाच्या निधनानंतर त्याच्या चार मुलांमध्यें त्याच्या साम्राज्याची वाटणी झाली असें पुराणांतील उल्लेखांवरून दिसतें. ज्येष्ठ पातीची राजधानी प्रथम नागपूरजवळचें **नन्दिवर्धन** व नंतर **प्रवरपुर** होती व तिच्या अंमलाखालीं **उत्तरविदर्भ प्रांत** होता. त्यानंतर दुसऱ्या मुलाची राजधानी **वत्सगुल्म** (सध्यांचें अकोला जिल्ह्यांतील **वाशीम**) असून त्याचें राज्य **दक्षिण विदर्भ** प्रांतावर पसरलें होतें. त्यानंतरच्या दोन मुलांमध्यें **गोदावरीच्या दक्षिणेचा** मुलुख असावा. पहिल्या दोन मुलांच्या वंशजांचे शिलालेख व ताम्रपट अनुक्रमें **उत्तर** व **दक्षिण** विदर्भांत (यांत **मध्यप्रांताच्या** व **हैद्राबाद संस्थानच्या मराठी जिल्ह्यांचाही** समावेश होतो) सांपडले आहेत. पण बाकीच्या दोन मुलांचे लेख कोठेंही अद्यापि सांपडले नाहींत. कदाचित् या दोन मुलांचें राज्य लौकरच नष्ट झालें असावें व त्याचें मुख्य कारण या मानपुरच्या राष्ट्रकूट घराण्याचा उदय हें असावें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

पांडरंगपल्ली ताम्रपटांत मानाङ्क राजानें **अश्मक** व **विदर्भ** प्रांत जिंकले होते, असा उल्लेख आहे. **अजंठ्याच्या** १६ नं. च्या **लेण्यांतील** लेखांत प्रवरसेनाचा नातू **विन्ध्यसेन** यानें **कुन्तलाधिपतीचा** पराभव केला होता असें वर्णन आलें आहे. मानपुरचे राष्ट्रकूट व वत्सगुल्माचे वाकाटक यांचीं राज्यें परस्परांस लागून होतीं तेव्हां त्यांच्यामध्यें असे खटक्याचें प्रसंग वरचेवर उद्भवत असले तर आश्चर्य नाहीं. एखादी लढाई अनिर्णीत राहिली म्हणजे दोन्ही पक्ष विजयावर हक्क सांगतात तसें याही प्रसंगीं झालें असल्यास मानाङ्क व विन्ध्यसेन हे समकालीन ठरतील. **विन्ध्यसेनाचा काल** अदमासें इ. स. ३६० ते ४०० असा ठरविला आहे तोच मानाङ्काचा मानल्यास हें राष्ट्रकूट घराणें इ. स. च्या चौथ्या शतकाच्या अखेरीस उदयास आलें असें म्हणतां येईल.

मानाङ्काचा मुलगा **देवराज** हा पांचव्या शतकाच्या आरंभीं गादीवर आला. त्यावेळीं उत्तर हिंदुस्थानांत **द्वितीयचंद्रगुप्त-विक्रमादित्य** याचें विशाल साम्राज्य होतें. याची मुलगी **प्रभावतीगुप्ता** वाकाटकांच्या ज्येष्ठ पातीच्या **द्वितीय**

**रुद्रसेन** नामक राजास दिली होती. लग्न झाल्यावर तो लौकरच कालवश झाल्यानें प्रभावतीगुप्ता आपल्या अल्पवयस्क मुलाच्या नांवानें राज्यकारभार पहात असे. तिला मदत करण्याकरितां चंद्रगुप्तानें आपले विश्वासू अधिकारी व मुत्सद्दी विदर्भांत पाठविले होते. या प्रसंगानें कविकुलगुरु **कालिदास** हाही नन्दिवर्धनगांवीं आला होता व त्यानें राजधानीजवळच्या **रामगिरीवर** आपलें सुंदर मेघदूत काव्य रचलें हें मीं इतरत्र दाखविलें आहे. या **कालिदासाला कुन्तलेशाच्या दरबारीं वकील** म्हणून पाठविलें होतें असें **भोजाचा शृंगारप्रकाश, राजशेखराची काव्यमीमांसा, क्षेमेन्द्राची औचित्यविचारचर्चा** इत्यादि संस्कृत ग्रंथांतील निर्देशावरून दिसतें. **उज्जैनीस** परत गेल्यावर **कुन्तलेश** काय करतो, असें चन्द्रगुप्तानें विचारतांच कालिदासानें त्याला खालील श्लोकांत उत्तर दिलें --

असकलहसिततत्वात्क्षालितानीव कान्त्या
मुकुलिनयनत्वाद्व्यक्तकर्णोत्पलानि ।
पिबति मधुसुगन्धीन्याननानि प्रियाणां
त्वयि विनिहितभारः कुन्तलानामधीशः ॥

याचा भावार्थ ' कुन्तलेश, तुझ्यावर, म्हणजे विक्रमादित्यावर, राज्यकारभाराचा भार टाकून स्वतः सुंदर स्त्रियांशीं रममाण होण्यांत काळ घालवीत आहे ' असा आहे. विक्रमादित्यानेंही त्याच श्लोकाच्या द्वितीयार्धांत थोडा फरक करून

' पिबतु मधुसुगन्धीन्याननानि प्रियाणां
मयि विनिहितभारः कुन्तलानामधीशः ॥

' मजवर राज्याचा भार टाकून कुन्तलेश सुखोपभोगांत रममाण होवो ' असें उत्तर दिलें. हा **कुन्तलेश** कोण याचा बरोबर पत्ता अद्याप लागला नव्हता. वाकाटकांच्या दरबारीं गुप्तांचें प्रस्थ त्या काळीं होतें असा स्पष्ट पुरावा असल्यानें कित्येक संशोधकांनीं वाकाटकांसच कुन्तलेश म्हटलें असावें असें अनुमान केलें होतें व व त्याचाच अनुवाद प्रस्तुत लेखकानें दहा वर्षांपूर्वी प्रकाशित झालेल्या आपल्या 'कालिदास' ग्रंथांत केला होता. पण आतां या मानपूरच्या कुन्तलाधिपति राष्ट्रकूटांचा शोध लागल्यामुळें चन्द्रगुप्ताचा वकील म्हणून कालिदास या राष्ट्रकूटांच्या दरबारीं राहिला असावा असें दिसतें. हा **कुन्तलेश** राष्ट्रकूटवंशी मानाङ्काचा मुलगा देवराज असावा. वर उल्लेखिलेल्या तीनही ताम्रपटांत याला देवराज इंद्राची उपमा दिली आहे कदाचित् इन्द्राप्रमाणें हाही विषयासक्त असावा.

गुप्त सम्राट **द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य** याचा आश्रय वाकाटक व राष्ट्रकूट या दोघांनाही असल्यामुळें या दोन राजवंशांमध्यें स्नेहसंबंध उत्पन्न झाला तर नवल नाहीं. चन्द्रगुप्ताची मुलगी प्रभावतीगुप्ता हिचा नातू वाकाटक नृपति **नरेन्द्रसेन**

याचा विवाह कुन्तलाधिपतीची कन्या **अज्झितभट्टारिका** हिच्याशीं झाल्याचें वाकाटकांच्या ताम्रपटावरून दिसतें. तीही मानपूरच्या राष्ट्रकूट वंशांतली असावी. याप्रमाणें महाराष्ट्राच्या या दोन राजवंशांत प्रेम व संबंध कांहीं काळपर्यंत तरी वाढत गेले असावे.

यानंतर वत्सगुल्माधिपति वाकाटकनृपति **हरिषेण** हा उदयास आला. हा मोठा महत्वाकांक्षी व बलाढ्य राजा होऊन गेला. यानें पूर्वेस दक्षिण कोसल, आन्ध्र व कलिंग; उत्तरेस अवन्ति, पश्चिमेस लाट व त्रिकूट या देशांवर ही स्वाऱ्या केल्या होत्या. यानें कुन्तल देशावर स्वारी करून त्याच्या राजाचा पराजय केल्याचा उल्लेख अजंठ्याच्या लेखांत आहे.

तथापि या पराजयामुळें हें राष्ट्रकूट घराणें नामशेष झालेलें दिसत नाहीं. उलट हरिषेणानंतर वाकाटकवंशाची इतिश्री झाल्यामुळें त्याचें सामर्थ्य वाढलें असावें. बेळगांव जिल्ह्यांतील **गोकाक** या गांवीं राष्ट्रकूटनृपति **देज्जमहाराज** याच्या काळचा एक ताम्रपट सांपडला आहे. त्यांतील उल्लेखावरून तो, इ. स. ५३२-३३ या वर्षी दिला असावा. ( एपिग्राफिया इंडिका पु. २१ पृ. २८९ पहा. ) हा **देज्जमहाराज** उपरिनिर्दिष्ट **अभिमन्यूचा** वंशज दिसतो. तसेंच कांहीं वर्षापूर्वी श्री. य. रा. गुप्ते यांस सातारा जिल्ह्यांतील खानापुरास एक अपूर्ण ताम्रपट मिळाला होता. त्यावर त्यांनीं मंडळांत वाचलेलें टिप्पण मंडळाच्या त्रैमासिकांत ( पु. ८, पृ. १६३ ) छापलें आहे. या ताम्रपटाचा पहिला पत्रा अद्यापि न मिळाल्यामुळें तो कोणत्या राजवंशाचा हें सांगतां येत नाहीं. तथापि अक्षरवटिकेवरून तो इ. स. च्या सहाव्या शतकांतील असावा असें श्री. गुप्ते यांचें मत आहे. या ताम्रपटांत **माधववर्म्यानें** दोन ब्राह्मणांच्या **कृष्णवेण्णाच्या** आग्नेय-दक्षिण दिशेस असलेलें **रेट्टूरक** गांव दान दिल्याचा उल्लेख आहे. हें रेट्टूरक **रेठरें बुद्रुक** असून तें निर्दिष्ट दिशेस आहे हें श्री. गुप्ते यांनीं दाखविलें आहे. हा **माधववर्मन्** कोणत्या वंशांतील याचा अद्यापपर्यंत पत्ता लागला नव्हता. पण राष्ट्रकूटांच्या त्याच काळाच्या व सातारा-कोल्हापूर-गोवा या भागांत सांपडलेल्या उपरिनिर्दिष्ट तीन ताम्रपटांवरून तो **राष्ट्रकूटच** असावा असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं.

माधववर्म्यानंतरच्या राष्ट्रकूटांचा पत्ता लागला नाहीं. तथापि सुप्रसिद्ध चालुक्य सम्राट् द्वितीय **पुलकेशी** यानें आपल्या चुलत्याचा पराभव करून **बदामीची** गादी हस्तगत केली त्या वेळीं चालुक्यांच्या राज्यांत सर्वत्र बंडाळी माजली होती. त्या आणीबाणीच्या प्रसंगाचा फायदा घेऊन **आप्पायिक** व **गोविंद** या दोन राजांनीं **भीमरथी उर्फ भीमा नदीच्या** उत्तरेच्या प्रदेशावर स्वारी केली होती.

त्यांपैकीं गोविंदाला आपल्या बाजूला वळवून पुलकेशीनें आप्पायिकाचा पराभव केला असें इ. स. ६३४ च्या **ऐहोळे ताम्रपटांत** म्हटलें आहे. हा **गोविंद राष्ट्रकूट** असावा असें डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकरांनीं अनुमान केलें होतें. कारण राष्ट्रकूटवंशांत गोविंद नांवाचे चार पांच राजे होऊन गेले. महाराष्ट्रांत इ. स. च्या चौथ्या ते सहाव्या शतकापर्यंत राष्ट्रकूट राजे राज्य करीत होते याविषयीं पुरावा डॉ. भांडारकरांच्या वेळीं मुळींच उपलब्ध नव्हता. पण त्यानंतर प्रकाशित झालेल्या लेखांवरून डॉ. भांडारकरांचें अनुमान बरोबर ठरत आहे.

ऐहोळे ताम्रपटांत पुढें म्हटलें आहे कीं या **गोविंदाला पुलकेशीवर** केलेल्या उपकाराचें फळ लागलीच मिळालें. तें कसें तें **रविकीर्ति** कवीनें त्या लेखांत सांगितलें नाहीं. कदाचित् **आप्पायिकाचा** पराभव करून मिळालेल्या लुटीचा किंवा प्रदेशाचा कांहीं भाग पुलकेशीनें गोविंदास दिला असावा. पण त्याच्या वंशजाना पुलकेशीनें दक्षिण महाराष्ट्रांत राज्य करूं दिलेलें दिसत नाहीं. कारण पुलकेशीच्या **विष्णुवर्धन** नामक भावाचा **सातान्यास** एक ताम्रपट मिळाला आहे, त्यांत **भीमाकांठचें** गांव दान दिल्याचा उल्लेख आहे. त्यावरून **पुलकेशीनें दक्षिण महाराष्ट्र** आपल्या साम्राज्यांत अंतर्भूत केला होता असें स्पष्ट दिसतें.

यानंतर **राष्ट्रकूट** राजे **वऱ्हाडांत** राज्य करतांना दिसतात. त्यांची राजधानी **अचलपूर** (वऱ्हाडच्या उमरावती जिल्ह्यांतील **एलिचपूर**) या नांवानें अद्यापि विद्यमान आहे मध्यप्रांताच्या बेतूल जिल्ह्यांत **तिवरखेड** येथें राष्ट्रकूटवंशी **नन्दराजाचा** इ. स. ६३१ चा एक ताम्रपट मिळाला आहे; त्यावरून तो इ. स. ६३० ते ६५० पर्यंत राज्य करीत होता असें दिसतें. या ताम्रपटांत **दुर्गराज गोविंदराज - स्वामिकराज- नन्नराज** अशी वंशावळ दिसते. नन्नराजाचा आजा गोविंदराज हा इ. स. ५९० ते ६१० पर्यंत राज्य करीत असावा. तेव्हां हा गोविंदराज पुलकेशीचा समकालीन होता यांत संशय नाहीं. तो व ऐहोळे लेखांत उल्लेखिलेला पुलकेशीचा सहाय्यक गोविंद हे एकच असावे. यावरून सहज कल्पना येते कीं **पुलकेशीनें गोविंदास** किंवा त्याच्या मुलास **विदर्भाचें राज्य** दिलें असावें. पुलकेशीच्या कारकीर्दीच्या आरंभीं उत्तर कोंकण, विदर्भ व गुजराथ या प्रांतावर **कलचूरींचें** साम्राज्य होतें. कलचूरि नृप **बुद्धराज** याचा पराभव करून पुलकेशीनें हे प्रांत आपल्या राज्यास जोडले. त्यामुळें तो त्या तीन महाराष्ट्रांचा अधिपति झाला; असें ऐहोळे लेखांत म्हटलें आहे. आपल्या विस्तृत साम्राज्यांतील प्रांतांवर त्यानें आपले नातेवाईक व विश्वासु सरदार प्रांताधिपति म्हणून नेमलेले दिसतात. तेव्हां आपल्यावर उपकार करणाऱ्या राष्ट्रकूटवंशी गोविंदराजास किंवा त्याच्या

स्वामिराज नामक मुलास विदर्भांचें संपन्न राज्य आपला मांडलिक म्हणून पुलकेशीनें दिलें असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं.

यानंतरचा राष्ट्रकूट वंशाचा सविस्तर इतिहास डॉ. अळतेकर यांनीं आपल्या पुस्तकांत दिला आहे. राष्ट्रकूटांच्या पूर्वपीठिकेविषयीं माहिती त्यांच्या पुस्तकांत साधनाभावीं दिली नव्हती, ती उणीव भरून काढण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखांत केला आहे.

---

# २ नांदगांव येथील कृष्णदेव यादवाच्या काळचा शक ११७७ चा शिलालेख

## ( महामहोपाध्याय प्रिन्सिपाल वा. वि. मिराशी )

हा* शिलालेख प्रथम कै. रायबहादूर हिरालाल यांनीं प्रकाशांत आणला. 'मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील कोरीव लेखांची यादी' या त्यांच्या पुस्तकाच्या द्वितीय आवृत्तींत या लेखाचा अंतर्भाव केला आहे. पण त्याची माहिती त्यांनीं अत्यंत संक्षेपानें दिली आहे. कांहीं वर्षांपूर्वीं हिंदुस्थान सरकारचे गव्हर्मेंट एपिग्राफिस्ट डॉ. छाबरा यांनीं या लेखाचा छाप घेऊन मजकडे वाचनार्थ पाठविला. यादव घराण्याविषयीं महाराष्ट्रास जिव्हाळा वाटत असल्यामुळें त्यावरील टिप्पण मंडळाच्या वार्षिक संमेलनाच्या प्रसंगीं वाचीत आहें.

**नांदगांव** हें खेडें वऱ्हाडांत अमरावतीच्या ईशान्येस २० मैलांवर वसलें आहे. गांवाबाहेर एका टेकडीवर **खंडेश्वर,** देवी व नरसिंह या तीन देवतांचें मिळून एक समान सभामंडप असलेलें देवालय आहे. या देवालयाच्या बाहेरच्या भिंतीवर प्रस्तुत शिलालेख कोरला आहे. उमरावती जिल्हा गॅझेटियरमध्यें या देवळाचें संक्षिप्त वर्णन दिलें आहे. हें देऊळ हेमाडपंती आहे असें म्हणतात. म्हणजे रामदेवराव यादव नृपतीचा प्रधान हेमाद्रि किंवा हेमाडपंत यानें प्रचलित केलेल्या शिल्पपद्धतीचें तें आहे अशी लोकांची समजूत आहे, पण गॅझेटियरमधील लेखकाच्या मतें तें फार तर दोनशें वर्षांचें जुनें असावें. या प्रश्नाचा पुढें विचार करूं.

प्रस्तुत लेख सहा ओळींचा असून त्यानें २ फूट ५ इं. रुंद व ९ इं. उंच इतकी जागा व्यापिली आहे. ज्या दगडावर हा लेख कोरला आहे तो प्रथम गुळगुळीत केला नव्हता. शिवाय आज कित्येक शतकें उन्हापावसांत असल्यामुळें तो बराच खराब

---

* संमेलन ३४ शा. १८६९-१९४७.

झाला आहे. कांहीं अक्षरें निश्चितपणें वाचतां येत नाहींत. तथापि एकंदरींत लेखां-तील मजकुराविषयीं संशय राहत नाहीं.

लेखाच्या आरंभींचा भाग संस्कृतांत असून नंतरचा मराठींत आहे. भाषेच्या बाबतींत लक्षांत ठेवावयाची गोष्ट म्हणजे 'ख' बद्दल 'ष' चा उपयोग केला आहे. उदाहरणार्थ लाषोलीए (लाखोलीए) पहा. ही पद्धत यादवकालीन इतर लेखांतही आढळते. **रामटेकचा रामदेवराव** यादवाच्या काळचा शिलालेख (सरदेसाई स्मारकग्रंथ, पृ. ११५–१३४) पहा. तसेंच 'वडवा' या शब्दाचा उपयोगही पाहाण्यासारखा आहे. सध्यां बडवा याचा अर्थ देवळांतील पुजारी असा आहे. पण यादवकालीं त्याला यापेक्षां व्यापक अर्थ असे. **पुरुषोत्तमपुरी** येथें सांपडलेल्या रामदेवरावाच्या काळच्या ताम्रपटांत 'फुलवडुए' हा शब्द राजाचा 'पुष्परचनाध्यक्ष' या अर्थी आला आहे. हा शब्द महानुभावांच्या शिशुपालवध या ग्रंथांतहि आढळतो.

प्रस्तुत लेख श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ती **श्रीकान्हिरदेव** याच्या काळचा आहे. या राजाच्या वंशाचा यांत निर्देश नाहीं. तथापि 'प्रौढ प्रताप चक्रवर्ती' हें बिरुद प्राचीनकाळीं यादववंशी राजांनींच धारण केलें होतें. तेव्हा हा लेख **देवगिरीच्या कृष्णदेवराव यादवाच्या** काळचा आहे यांत शंका नाहीं. कान्हिर हे 'कृष्ण' या संस्कृत नांवाचें अपभ्रष्ट रूप आहे. या नांवाचे कान्हर, कान्ह, कन्हार, कन्धार असे इतरही अप-भ्रंश कोरीव लेखांत येतात. प्रस्तुत लेख शक ११७७ आनंद संवत्सरीं कोरला होता. या लेखांत महिना, तिथि, वार किंवा नक्षत्र दिलें नसल्यामुळें या कालाचा पडताळा पाहणें शक्य नाहीं. तथापि वर्तमान शक ११७७ ला आनंद संवत्सर येतो. यावरून या लेखाच्या प्रमाणतेविषयीं संशय राहत नाहीं. सामान्यतः कोरीव लेखांत शकवर्ष गत व संवत्सर वर्तमान असतात. प्रस्तुत लेखांत दोन्ही वर्तमान आहेत, हें विशेष आहे. या शकवर्षीं ख्रिस्ती शकाचें वर्ष १२५५–५६ हें येतें. यावरून हा लेख जवळ जवळ सातशें वर्षांपूर्वींचा आहे हें दिसून येईल.

सन १२५५–५६ हें वर्ष **कृष्णदेव यादवाच्या** कारकीर्दींत पडतें. कोरीव लेखांवरून या राजानें इ. स. १२४७ पासून १२६० पर्यंत राज्य केलें, असें आतां निश्चित झालें आहे. या राजाचा दुसरा एक लेख चांदा जिल्ह्यांतील **मार्कंडी** या गांवीं आहे व तो डॉ. यशवंत खुशाल देशपांडे यांनीं मंडळाच्या त्रैमासिकांत छापला आहे. यादव राजे हे मूळचे देवगिरीचे. तथापि त्यांनीं कृष्णदेवाचा आजा **सिंघण** याच्या कारकीर्दींतच वऱ्हाड जिंकून आपल्या राज्याला जोडला होता. बुलढाणा जिल्ह्यांतील **अंबडापूर** येथें सिंघणाच्या काळचा एक शिलालेख आहे तो मीं एपिग्राफिया इंडिका (पुस्तक

२१, पृ. १२७–२८ ) मध्यें छापला आहे. सिंघणाचा सेनापति खोलेश्वर हा आपल्या आंबेगांवच्या शिलालेखांत वरदा ( वर्धा ) व पयोष्णी ( पूर्णा ) या नद्यांच्या तीरावर अग्रहार दिल्याचें व देवळें बांधल्याचें सांगतो. मागें उल्लेखिलेल्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटांत कृष्णदेवानें कोसल देशाच्या ( म्हणजे सध्यांच्या छत्तीसगडच्या ) राजास त्रस्त केल्याचें वर्णन आहे. तेव्हां कृष्णाच्या काळचे लेख मध्यप्रांत वऱ्हाडच्या उमरावती व चांदा जिल्ह्यांत सांपडले तर त्यांत आश्चर्य नाहीं.

या लेखाचा उद्देश कांहीं लोकांनीं खंडेश्वराच्या देवळांत लाखोली किंवा लक्ष फुलें देवाला वाहाण्याकरितां गद्याण नामक नाणीं दिलीं हें नमूद करण्याचा आहे. यांत दहा लोकांचीं नांवें आलीं आहेत. पैकीं पहिल्या नऊ जणांनीं एका लाखोलीकरितां व दहाव्यानें दोन लाखोलींकरितां व्यवस्था केली होती.

गद्याण किंवा गदियाण हें लहानसें सोन्याचें नाणें महाराष्ट्रांत प्रचलित होतें. शक ९३० च्या खारेपाटणच्या लेखांत परदेशाहून येणाऱ्या प्रत्येक जहाजावर एक सुवर्ण गद्याण शुल्क किंवा कस्टम् ड्यूटी म्हणून शिलाहारवंश रट्ट राजानें शैव आचार्यांस दान दिल्याचा उल्लेख आहे. किट्टेल साहेबास कर्नाटकांत बेल्लारी व मैसूर येथें एक फार्दिंगच्या वजनाचीं सोन्याचीं नाणीं प्रचलित असलेलीं दिसलीं. तीं येथें विवक्षित असावीं. भास्कराचार्यांच्या लीलावतींत गद्यानकाचें वजन पुढीलप्रमाणें दिलें आहे.

तुल्या यवाभ्यां कथितात्र गुञ्जा वल्लस्त्रिगुञ्जो धरणञ्च तेऽष्टौ ।
गद्यानकस्तद्द्वयमिन्द्रतुल्यैर्वल्लैस्तथैको धटकः प्रदिष्टः ॥

यावरून गद्याणक हें ४८ गुंजा वजनाचें किंवा अधेलीच्या वजनाचें सोन्याचें नाणें होतें हें दिसून येईल.

प्राचीन काळीं देवतांच्या पूजेनिमित्त अशी व्यवस्था करण्याची पद्धत होती. पंढरपूरच्या चौऱ्यायशीच्या लेखांत अशा प्रकारें फुलें, तुळशी, वगैरे करितां गद्याण दिल्याचा उल्लेख आहे. हे पैसे कोणा स्थानिक पेढीवर ठेवून त्याच्या व्याजांतून फुलादिकांची व्यवस्था केली जात असे, असें चौऱ्यायशीच्या लेखावरून दिसतें.

प्रस्तुत लेखावरून नांदगांवचें देवालय यादवकालीन आहे हें दिसून येईल. तें हेमाडपंती पद्धतीचें आहे. या शिल्पपद्धतींत मोठमोठ्या दगडांचा उपयोग चुन्याशिवाय केलेला असतो. हेमाद्रिपंडितानें लंकेहून ही शिल्पपद्धती व मोडी लिपी आणिली अशी आख्यायिका आहे. तथापि प्रस्तुत लेखावरून ती शिल्पपद्धती हेमाद्रीनें प्रथम प्रचालित केली असें दिसत नाहीं. कारण तो कृष्णदेवाचा बंधु महादेव याच्या काळीं उदयास आला. तो महादेव व रामदेवराव यांचा प्रधानमंत्री होता. त्याच्या अगोदरच ही शिल्पपद्धती प्रचलित होती असें दिसून येईल.

## शिलालेखाचें वाचन

ओळ

१ ओं स्वस्ति [ :* ] श्री सकु ११७७ आनंदसंवत्सरे अद्येह श्रीमत्प्रौढप्रतापचक्र-वर्ति श्रीका-

२ न्हिरदेवविजयराज्ये तत्पादपद्मोपजीवी समस्तभरभारनिरूपित श्रीपांचो-

३ लिनि.....तन्निरूपिवितद्रवीडी वडवो श्रीसोमदेवदत्त लाषौलिए ग वडउ पं १॥

४ डितें दत्त लापोए ग १ [।*] आसुगिनायकें दत्त लापौलीए[1] ग १ [।*] ढों

५ ढिए दत्त लाषौलिए ग १ [।*] भोपतिनायकें दत्त लाषोए ग [।*] धनैएं दत्त लाषौलिए ग १ [।*]

६ [ ना ] गैएं [ द ] त्त लापोए ग [।*] प्रति (?) श्रीठाकुरें दत्त लाषौलिएं ग १ [।*] ढोढडदाऊ दत्त द्वि लापोए [।*]

---

# ३ हिंगणगांव ( जखणगांव ) येथील शिलालेख

श्री. सर. गं. ना. मुजूमदार, पुणें

जिल्हा अहमदनगर, ता. नगर पैकीं मौजे **हिंगणगांव**–जखणगांव हें गांव अहमदनगरपासून पश्चिमेस सुमारें सात मैलांवर आहे. येथें **सोमेश्वर** महादेवाचें एक देवालय व बारव आहे. या दोन्ही जागीं शिलालेख आहेत. ते पुढें दिले आहेत. अहमदनगरच्या गॅझेटीयरमध्यें या शिलालेखांचा उल्लेख नाहीं व इतरत्रहि आढळले नाहींत. म्हणून ते आपणापुढें मांडीत आहे. ग्वाल्हेर दरबारीं **मुळे** हे एक सरदार होते. त्यांचें मूळ गांव हिंगणगांव हें होतें. म्हणून तेथेंच त्यांनीं आपलीं स्मारकें या देवालय व बारव रूपानें करून ठेवलेलीं आहेत. या मुळे–घराण्याचा एक मोठा वाडा होता परंतु तो हल्लीं अगदीं पडीक आहे.

{ शक १६८९ श्रावण शु. ५
{ इ. स. १७६७ जुलै ३१

### (१) सोमेश्वर देवालयावरील शिलालेख

श्रीसोमेश्वरचरणीं तत्पर वि (–)
ठल हरि मुळे मौजे हिंगणगांव
जखणगांव निरंतर शक १६८९
श्रावणशुद्ध ५ समाप्तमस्तु
सण ११७७

---

१ लाखोली ( लक्ष फुलां ) करितं गद्यानक १. याप्रमाणें पुढेंही समजावें.

### (२) बारवेवरील शिलालेख

{ श. १६६४ मार्ग. शु, ७
{ इ. १७४२ नोव्हें. २३

श्रीसिद्धेश्वर चरणी तत्प
र वीटल हरी मुळे मौजे हीं
गणगांव सके १६६४ नंदन
नामसंवत्सरे मार्गेश्वर शुद्ध
७ तद्दीन वापी समाप्त ११५२

---

ह्या लेखांत आलेल्या कालोल्लेखाविषयीं प्रश्न आहे. १६६४ शकाला दुंदुभि हें नांव येतें. पण लेखांत नंदन दिलें आहे. दोन्ही संवत्सरनामांत तीस वर्षांचें अंतर आहे. लेखाच्या शेवटीं ११५२ हा आंकडा दिला आहे. तो फसलीचा मानल्यास शक १६६४ हा आंकडा बरोबर जमतो. येथें फसली व शकांक जमेस धरून हा काल दिला आहे.

या लेखावरून प्रथम बारव व नंतर सोमेश्वर देवालय हीं बांधलीं हें उघड आहे. बारव ही यांच्या इनाम जमिनींत आहे[१].

---

## ४ घर, दार व खटलें

[श्री. गोविंद कृष्ण मोडक, पुणें.]

हे वरील तीन शब्द आपण वारंवार योजितों. यांच्या व्युत्पत्तीचा विचार पुढें केला आहे[२].

**घर**—हा शब्द संस्कृत गृह–वरून आला आहे. गृह हा शब्द ग्रह्–पासून निघाला असावा. ग्रह्–'घेणें' यावरून 'अनेक वस्तू आपणांमध्यें घेतें तें' गृह असा अर्थ निष्पन्न होतो. गृह–चें रूपांतर घर असेंही संस्कृतांत आढळतें. घर हा शब्द अपभ्रंशांत सर्हा गृह या अर्थी योजितात. यावरून संस्कृतांत त्याचा प्रवेश प्राकृतांतून झाला असावा. या संबंधांत लक्षणीय कीं संस्कृतांत गृह न. लिं. आहे; तर घर हा कोशांत पुल्लिंगी आढळतो ( आपटे कोश ).

---

१ संमेलन ३४ वें. श. १८६९-१९४७.

२ वाढदिवस ३२ वा. श. १८६४–१९४२.

**दार**--हा शब्द **द्वार**-वरून आला आहे. स्वतः **द्वार** हा द्वि-अरर वरून आलेला दिसतो. अरर-चा अर्थ दाराची फळी असा आहे. अर्थात् द्वार हा शब्द मूलतः 'दोन बाजूंस असलेल्या फळ्या मिळून बनलेला एक दरवाजा' अशा अर्थानें प्रवृत्त झालेला दिसतो. याचें पूर्ण रूप आरंभीं **द्व्यरर** व पुढें **द्वार**, द्वार्, असें झालेलें दिसतें. यांतील द्वार-मधील व्-चा लोप होऊन दार हा मराठींत आला आहे आणि द्-चा लोप होऊन वार अथवा बार, व त्यापासून बारी हा हिंदी शब्द बनलेला दिसतो. मराठी दर-चा मूल अर्थ (सामान्य) दरवाजा असा होत असून, 'घर-दार' अशा ठिकाणीं म्हणजे पूर्वस्थित घर-च्या साहचर्यानें, घराचा बाह्यभाग, घराचें परूस, परिसर असा होतो. तेव्हां घर-दार या शब्दांचा अर्थ 'घर व त्याच्या भोंवतालचें आवार' असा होतो.

दार असा ही संस्कृतांत शब्द आहे. त्याचा अर्थ **स्त्री** असा आहे. यामुळें येथें पुढील शंकेचा विचार प्राप्त होतो. **शंका**—घर-च्या पुढें योजिलेला दार हा शब्द स्त्रीवाचक समजावा. **उत्तर** (क) तुमचें घरदार कोठें आहे? या प्रश्नांत दार-चा अर्थ स्त्री संभाव्य नाहीं; कारण घरापेक्षां स्त्रीला महत्त्व अधिक असल्यामुळें, येथील प्रश्नांत दार हा शब्द स्त्रीवाचक असल्यास तो प्रथम आला पाहिजे. अर्थात् तसा नसल्यानें त्याचा अर्थ स्त्री असा घेतां येत नाहीं. (ख) पुढील मुलींच्या ओवींत दार-चा अर्थ परूस असाच होतो, हें उघड आहे. ती ओंवी—

नवरा पाहूं आले, काय पाहतां घर- दार।
नवरा आहे प्रथमवर, दादा राया ॥

(ग) घरीं-दारीं कंसाला कृष्णच दिसत होता. यांत दार-चा अर्थ स्त्री असा शक्यच नाहीं. (घ) घर-दार विकणें, घरा-दारावर नांगर फिरणें, इत्यादि शब्दयोगांमध्येंही दारचा अर्थ स्त्री संभवत नाहीं. (ङ) हिंदीमध्यें घर-बार असा शब्द योजितात. यांत बार हा अवयव उघड-उघड द्वार-पासूनच आला आहे. अर्थात् घर-चे पुढें द्वार या अर्थींच बार-चा उपयोग होत असल्यानें, या साम्यानें मराठींतही घरदार यांतील उत्तरावयव द्वार-पासूनच आलेला मानणें योग्य आहे. सारांश, घर-शीं सहचरित दार हा शब्द स्त्रीवाचक दार-तत्सम नसून, तो द्वार-पासून साधलेला आहे.

**खटलें**—हा शब्द मराठींत स्त्री-वाचक असून न. लिं. आहे. अशीच स्थिति संस्कृतांत कलत्र-ची आहे. म्हणजे लिंग व अर्थ या दोन्हींमध्यें खटलें-चें कलत्र-शीं साम्य आहे. तेव्हां कलत्र हें त्याचें मूळ असेल काय? अशी शंका मनांत येते. या शब्दांच्या रूपांकडे पाहतां हे शब्द जनक-जन्य दिसतात. कलत्र मधील (१) क-चा ख होऊन आणि (२) लत्र यांतील अक्षरांची उलटापालट होऊन आणि (३) इतर किरकोळ विकार होऊन कलत्र-पासून खटलें येणें, व्युत्पत्तिदृष्ट्या नियमा-

नुसारीच आहे. अर्थात् अशा रीतीनें अर्थ, लिंग आणि घटकाक्षरें यांच्या साम्यानें कलत्र-पासून खटलें हा शब्द तद्भव सिद्ध होतो. यांतील रूप-विकारांस पुढील उदाहरणांनीं सशास्त्रता येते. कूट-खोटें यांत क-चा ख झाला आहे. उत्-सृप् पासून आलेल्या उसप या शब्दाचें उपस हें रूप होण्यांत अक्षर-विपर्यय स्पष्ट आहे. असाच प्रकार प्रस्तुतांतही आहे. सारांश, खटलें हा शब्द कलत्र-वरून साधणें सर्वथा सशास्त्र ठरतें.

खटलें-ची वरील व्युत्पत्ति सुचविल्याबद्दल प्रा. रामभाऊ केळकर यांचा मी आभारी आहें.

---

# ५ पुरंदरच्या कोळीप्रकरणावर नवा प्रकाश

श्री. वि. सि. चितळे, एम्. ए., बी. टी., टी. डी., ( लंडन ), पुणें

रा. कृष्णाजीपंत पुरंदरे यांनीं आपलें 'पुरंदरे दप्तर, भाग ३' प्रसिद्ध केल्यापासून पुरंदरच्या कोळ्यांच्या दंग्यासंबंधीं बराच वाद माजला. त्यासंबंधीं लिहितांना श्री. पुरंदरे लिहितात, "बाहेरून क्षुल्लक भासणारें, पण ज्याच्या आंत विशिष्ट कारस्थान खेळत राहिल्यानें जें परिणामाच्या दृष्टीनें महत्त्वाचें गणलें जातें," असें हें प्रकरण आहे ( पु. द. ३ प्रस्तावना पान ४१ ). "पुरंदरच्या कोळ्यांचा दंगा यदृच्छेनें घडला नसून, ती गोष्ट पूर्वसंकेतानुरूप, विवक्षित ध्येय पुढें ठेवूनच सिद्ध झाली असल्यानें हा प्रसंग एक ऐतिहासिक चर्चेचा विषय होऊन बसला आहे." सर्वसाधारणपणें अशी टीका त्यांनीं केली असती तरी हरकत नव्हती; परंतु त्यांच्या या टीकेचा स्पष्ट रोख रघुनाथराव, आबा पुरंदरे व सखाराम बापू यांना उचलून धरून पेशवा माधवराव व त्याचें साहाय्यक यांच्या माथीं राजकारणाचें सर्व खापर फोडण्याचा आहे. असें म्हणण्याचें कारण त्यांच्याच शब्दांत सांगणें योग्य होईल. ते म्हणतात, "आम्हीं आपलें प्रतिपादन ज्या विशिष्ट मुद्याला धरून चालविलें आहे, त्याशीं तर या प्रसंगाचा अगदीं जिव्हाळ्याचा संबंध येऊन पोंचतो...... स्वतः पेशवे शपथपूर्वक या कृत्याशीं आपला संबंध नाहीं, असें म्हणत असतां आम्ही ती गोष्ट राजकारणी समजून पेशव्यानें ही गोष्ट सान्याकरवीं जाणून बुजून केली असें म्हणतों ( पु. द. ३ प्रस्ता. पान ४४ ). तेव्हां रा. पुरंदरे यांचा सर्व रोख माधवराव पेशव्यावर आहे हें ह्यावरून सिद्ध होत आहे. परंतु ही वस्तुस्थिति खरी नसून या प्रकरणीं मुख्य **सूत्रधार रघुनाथराव दादाच** होता व त्यानें आपला 'पुरतपन्हा कोणास कळों न देतां आत येक व बाहेर जाहिराणा एक दर्शविला होता,' असा आमचा दावा आहे. हें कसें तें सांगण्यापूर्वीं पुरंदरच्या कोळी प्रकरणाचा उद्भव कसा झाला हें आपण प्रथम थोडक्यांत पाहूं.

**घोडनदीच्या** लढाईनंतर माधवराव पेशवा चुलत्याच्या स्वाधीन झाला. तेव्हां आपला पूर्ण विजय झालासें पाहून रघुनाथरावानें आपल्या मदतनिसांस बक्षिसें वाटण्याचा अपूर्व सोहाळा उरकून घेतला. त्यावेळीं दादानें किल्ले **पुरंदर** राजश्री **आबा पुरंदरे** व **सखाराम बापू** यांचे निसबतीस दिला. परंतु ही नवी नेमणूक लोकांस फारशी प्रिय वाटली नाहीं. राक्षसभुवनच्या लढाईनंतर ' आम्ही पेक्षां अधिक जहाले ' असा जाहिराणा करून रघुनाथरावानें सर्व कारभार पुतण्याच्या हवालीं केला व तो **नाशिकला** जाऊन राहिला. त्याच सुमारास **माधवराव कर्नाटकच्या** स्वारीवर निघून गेला. याच वेळीं **पुरंदरच्या कोळीप्रकरणास** सुरुवात होऊन त्याचे संबंधीं सर्वत्र चर्चा होऊं लागली.

पुरंदरच्या किल्ल्याचा ताबा आपल्याकडे आल्यावर **आबा पुरंदऱ्यानें** प्रथम गडावरील **जुन्या कोळयांस** रजा देऊन त्यांच्या जागीं नवीं माणसें नेमलीं. जुने कोळी कांहीं गडबड–सडबड करितील म्हणून पुरंदराभोवतीं चौक्या ठेवून दिल्या, सासवडीं ' पाईचें माणूस ' दोनचार हजार ठेवून दिले व "**पुरंदरभोवते गांव** होते तेथें ताकीद करून ते वोस करविले, बाजार मरूं नये अशी ताकीद केली व आपुण खास वाड्याबाहेर जात नाहीं, वाड्याचा बंदोबस्त करितात. " ( खंड १४, ८० ) ज्यांनीं आपल्या पिढयान्–पिढ्या पुरंदर किल्ला व त्याच्या आसमंतातील पंचक्रोशी ह्यांच्या संरक्षणार्थ खर्च केल्या, त्या कोळ्यांस ही व्यवस्था आवडणें शक्यच नव्हते. ' कोणे मजकुरावरी आमचेविशींचा संदेह त्यास ( आबास ) निर्माण होऊन किल्ल्याचे चाकरीवरून आम्हास दूर केलें व आमचे जीवाचें संकट आम्हांस पडलें ' ( पे. द. १९, ३२ ) असें त्यांस वाटूं लागलें, व कांहीं झालें तरी आपलें पूर्वापारचें वतन परत मिळावावयाचेंच असा त्यांनीं निश्चय केला. याच सुमारास **आबा** पुरंदरे **नाशिकास दादाला** भेटण्याकरितां गेला होता. त्या संधीचा फायदा घेऊन ता. ७ मे १७६४, वैशाख शुद्ध षष्ठीस, 'घर शाकारावयाचे निमित्य करून च्यारसे माणूस गडावर गेले आणि बाघाची पारत निघाली ऐसी बाजी करून कबरबस्ती करून सदरेवर चालून आले युध्य फार जाले; पुरंधर घेतल्यावर पाचवे रोजीं रुद्रमाळ घेतली ' ( पु. द. ३, ३४ ). अशा रीतीनें **कोळयांनीं दंगा** करून पुरंदरचा ताबा मिळविला, व **आबा पुरंदऱ्याचा** गडावरील अंमल उठवून लावून कोळ्यांनीं सर्वत्र आपला अंमल बसविला. ही सर्व घटना नाशिकास आबा पुरंदऱ्याला कळल्यावर तो टाकोटाक सासवडास आला; त्याच वेळीं विसाजी केशव **साने** या नांवाचा गृहस्थ कोळ्यांच्या बोलावण्यावरून गडावर गेला व गडावरील सर्व व्यवस्था पाहूं लागला. ही सर्व घटना पाहून आबा पुरंदऱ्यास मात्र वाईट वाटणें शक्य आहे.

विसाजी केशव साने हा या बनावाचा मुख्य सूत्रधार होता, असा रा. पुरंदरे यांचा ठाम सिद्धांत आहे; परंतु त्या बाबतींत आमचा मतभेद आहे.

विसाजी केशव हा आबा पुरंदऱ्याचा भाऊ **धोंडोपंत पुरंदरे** याचा कारकून होता. धोंडोपंत पुरंदऱ्यानें गेले दोनतीन वर्षांपूर्वींच विसाजी केशवाला 'आपल्या नोकरींतून दूर केलें होतें. **आबा व आप्पा पुरंदरे** या भावाभावांचें ठीक नव्हतेंच. अशा स्थितींतच **आप्पानें आबाचा** काटा काढण्याकरितां विसाजी केशवाला अंतस्थरीतीनें मध्यस्थी केलें व त्याच्या करवीं हा कोळ्यांचा दंगा उभा केला, असा कोणाचा दावा असल्यास तो रास्त नाहीं. सान्याला पुरंदरची खडानुखडा माहिती होती, कोळ्यांचाही त्याच्यावर विश्वास होता; परंतु यामुळें तो धोंडोपंत व पेशवा माधवराव यांचा अंतस्थ मदतनीस बनला व त्यानें हा बनाव घडवून आणला याला सबळ पुरावा काय? कोळ्यांनीं त्याला दंग्यानंतर वर नेला तो **रघुनाथरावाच्या** चिथावणीनें कशावरून नाहीं? आम्हाला तर अशी शंका येते कीं, आबाच्या ताब्यांत पुरंदर किल्ला दिला ही आपण चूक केली असें **दादास** एकसारखें वाटत होतें व म्हणून त्यानें **विसाजी केशवाला** आपलासा करून त्याच्याकरवीं हा दंगा उभा केला. **आपा पुरंदऱ्यानें** तर असें शफतपूर्वक सांगितलें कीं 'आम्ही जर त्याजला पत्र किंवा जबानी सांगितलें आसेल कीं आबाचा किल्ला घेणें तर आम्हास तुमच्या गल्या (ची) शफत असे.' (पु. द. ३, ३३ ). इतकेंच नव्हे तर **सान्या**-संबंधीं धोंडोपंत पुढें लिहितो; 'तुम्ही त्याजकडे विस्वास सहसा न धरणें, तुम्हास हरयेक मोहाचा प्रकार लिहून पाठवितील आगर आ(प)ण कुकर्म केले याला सामील कोणी... असावा यास्तव तुम्हास लि।। तर तुम्हीं सहसा ते गोष्टीवर न जाणें.'' (किल्ला). जुन्या धन्याचें सान्याला हें उत्तम सर्टिफिकिट आहे. असल्या मनुष्याला **धोंडोपंत** हातीं धरील असें वाटत नाहीं. अशा तऱ्हेचें अन्यायाचें वर्तन तूं कां केलेंस असें सान्यास विचारतां त्या बहाद्दरानें बिनदिक्कत सांगितलें कीं, "**श्रीमंताचे** आज्ञेवरून घेतला" (पु. द. ३, ३२ ). यावरून साने माधवरावाचाच हस्तक होता हें पूर्णांशानें सिद्ध होत नाहीं; कारण **श्रीमंत** म्हणजे दादासाहेब असेंही होऊं शकतें. नाना फडणिसानें गोविंद शिवराम खाजगीवाल्यास ता. ८ जूनच्या पत्रांत असें स्पष्टच लिहिलें आहे कीं 'श्रीमंतांची आज्ञा नसतां मध्येंच लबाडी करून श्रीमंतांचें (माधवराव पेशव्याचें) नांव करून पुरंदर किल्ला घेतला' (खंड १४, ७२ ). यावरून **विसाजी केशव** हा **दादांचाच हस्तक** बनला होता, माधवरावाचा नाहीं, हाच कयास बरोबर ठरतो. मात्र सान्याच्या या आगळिकीबद्दल बिचाऱ्या **धोंडोपंताला** मात्र विनाकारण त्रास सहन करावा लागला. कारण, पेशव्यानें त्याचा सरंजाम जप्त केला ( पु. द. ३, ३७ ). याला कारणही बहुधा रघुनाथरावच असावा. कारण त्याला 'आंत एक व बाहेर एक असा जाहिराणा' करावयाचा असल्यानें त्यानें पुलण्यास तसा हुकूम अंतस्थरीतीनें पाठविला असावा.

पुरंदरचा किल्ला दंगा करून कोळ्यांनीं आपल्या ताब्यांत घेतला ही गोष्ट

कर्नाटकच्या स्वारींत असतां माधवरावाच्या कानीं गेली. तेव्हां त्यानें **चिंतो विठ्ठलास** ता २० मे १७६४ रोजीं पत्र लिहून कळविलें कीं, 'पुरंधरचे जुने लोकांनीं आमचें नांव पुढें करून दग्यानें किल्ला घेतला म्हणोन परस्परें वर्तमान विदित जालें' त्यास हे गोष्ट आम्हांस किमपि ठाऊक नसतां मधीं लबाडी करून कर्म केलें. त्याचे पारिपत्याविशीं तीर्थरूपांस लिहिलें आहे. तुम्हीही विनंति करून लबाडी केली त्यांचें पारिपत्य करावीणें. वडिलांच्या चित्तांत संशय न ये तें करणें' (खंड १३, ८२). यावरूनही या कृत्यांत **माधवरावाचा** बिलकूल हात नव्हता हेंच सिद्ध होतें. इतकें असूनही सर्वत्र आवई उठली कीं पूर्वसंकेतानें हें सर्व प्रकरण उद्भवलें. ती गोष्ट पूर्वसंकेतानुरूपच झाली अशी स्वारींत **नाना पुरंदऱ्याकडेहि** पत्रें गेलीं. तेव्हां त्यानें एकदां नव्हे दोनदां असें ठासून लिहिलें कीं, 'येथील संकेतानें हा प्रकार किमपि न जाहला. **कोळीबेरड** स्थाई कदीम तिशा वर्षांचे चाकर त्यांस दूर करून अन्नास यजित केलें यासाठी त्यानीं दावा पाहून हें कर्म केले. येथील मर्जींत एक मर्जींवरच कायम आहे. वरकड दुष्ट लोक नाना प्रकारें तेथें विकल्प आणून देतील तरी इलाज नाहीं. परंतु सत्य गोष्ट अशी आहे" (खंड १४, ७४) व (खंड १४, ४८) "हा प्रकार येथून संकेतानें जाहला नाहीं हें प्रमाण आहे. कोळीबेरड बाहेर घातले. कोठें त्यास थारा नाहींशी जाहाली. याजकरितां त्याणीं किल्ला घेतला. त्यांचें लक्ष उभयतां श्रीमंताखेरीज दुसरे ठाई नाहीं, असें आहे. याखेरीज विपरीत भाव आणणार आणतील तर इलाज नाहीं." नाना पुरंदऱ्यासारख्या मुरलेल्या मुत्सद्याचा हा पुरावा एकतर्फी आहे असें मानणें फार धोक्याचें ठरेल. मग या कामीं माधवरावाचा हात होता असें कसें म्हणावें? उलट **सखारामबापूस** ही हकीकत कळल्यावर त्यानें उलट **नाना पुरंदऱ्यावरच** सर्व आळ घेतला हेंही आश्चर्य करण्यासारखें नाहीं काय? (खंड १४, ८०) याच वेळीं खुद्द विसाजी केशवानें **थोरले श्रीमंत** यांस (म्हणजे दादासाहेबांस) विनंतिपत्र व कच्चें वर्तमान लिहून पाठविलें होतें. त्यावरून "धनी मेहरवान होऊन सेवकांस कौल सादर केला तो ताईतांत घालून हृदयीं धरिला" (खंड १४, ३०). यावरून **रघुनाथरावानें आबास** दूर लोटून सान्यासच कवटाळिलें असें सिद्ध होत नाहीं काय? आणि मग थोरल्या श्रीमंतांचा संकेत ठरला, तो त्यांनीं सान्यास कळविला व त्याप्रमाणें तो त्यानें पार पाडला यांत विशेषसें काय झालें? मग यांत पूर्वसंकेत दादाचा कीं माधवरावाचा हें सूज्ञांस सांगण्याची आवश्यकताच राहात नाहीं. असें असूनही **रघुनाथरावानें विसाजी केशवाचा** सूड उगविण्यास कमी केलें नाहीं. एकीकडे कौल देऊन 'मागें राजश्री **राजाराम गोविंद श्रीमंतीं** आमच्या (सान्याच्या) पारपत्यास रवाना केलें. त्यांनीं येऊन प्रज्यांस पीडा बहुत केली. गडकरियाचे कबिले कितेक धरिले, बायकापोरें यांस मारहाण करून चोळणे घालविलें, पोरें सराट्यांवर टाकिलीं. कितेक नागवणा घेऊन सोडविलीं, गीर्दनवाईचे गांव

लुटून जाळून उध्वस्त केले, वीसपंचवीस जुझें झुंजले. इतकेंही सोसून आजिपर्यंत धण्याच्या पत्रावर खुशाल होते........सासवडचे फौजेनें होते गांव ते जाळिले आणखींहि जाळितात. पुढें काय करतील तें न कळे. तस्मात् धन्यानें कौल दिल्हा आणि प्रस्तुत अवकृपा दिसती यावरून अपूर्व वाटलें; कां कीं ........ धन्याचा कौल असतां कालादिकांचेही भय नसावें आणि धनीच दुसरी गोष्ट बोलतात हेंच अपूर्व आहे." ( खंड १४, ३० ). ह्या **विसाजी केशवाच्या** पत्रावरून **रघुनाथरावाचें** वर्तन 'दाखवावयाचे' दांत निराळे व खावयाचे दांत निराळे याच मासल्याचें होतें हेंच सिद्ध होतें. अर्थात् खरा सूत्रधार माधवराव पेशवा, विसाजी केशव साने कीं स्वतः रघुनाथराव हें निराळे स्पष्ट शब्दांत सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. शिवाय, माधवराव देशीं आल्यावर पुरंदरच्या कोळ्यांशीं जो करार झाला त्यामध्यें '**विसाजी केशव** किल्यावर आल्यामुळें सरकार जागा जतन झाली; पुढें साहेबास शरण येऊन जागा हवाली केली. शहाणपणास येकनिष्ठेस अंतर केलें नाहीं. यास्तव किले पुरंदरची सबनिसाकडील फडणिसाची आसामी त्यांचेकडे नेहमीं करार करून द्यावी ...... विसाजी केशव साने यांना खोतीचा गांव मौजे **कोतळूक** ता। वेलहा सुभा दाभोल येथील मनसुची खोतीची आहे. ती त्याच्याकडे करार करावे' अशीं दोन कलमें आहेत ( पे. द. १९,३२ ). हीं कलमें कोणी घातली? विसाजी केशव हाच मूळ सूत्रधार अशी जर राघोबाची बालंबाल खात्री होती तर, त्यानें या कलमांस हरकत घेऊन, विसाजीस अद्दल घडेल अशी शिक्षा त्यानें खात्रीनें केली असती. निदान, तशी त्यानें निकड लावली असती तर माधवरावानें आपलाच हेका खात्रीनें चालविला नसता. चुलत्याच्या सल्ल्याप्रमाणें तो खात्रीनें वागला असता. नुसत्या संशयावरून ज्या पेशव्यानें धोंडोपंत पुरंदऱ्याचा सरंजाम जप्त केला, त्यानें विसाजी केशवासारख्या माणसाच्या घरादारावरून नांगर फिरवून त्यास देशोधडीस लावण्यास कमी केलें नसतें. पण या कामीं रघुनाथराव गप्प बसला. यावरूनच विसाजी केशव याला सामील करून घेऊन व त्याला पुढें करून रघुनाथरावानें आपला कार्यभाग साधून घेतला व तो स्वतः नामानिराळा राहिला हेंच सिद्ध होत नाहीं काय?

पुरंदरच्या कोळ्यांनीं दंगा करून तेथें आपला अंमल त्यांनीं सुरू केला. तेव्हां **रघुनाथरावानें** आकसताळेपणा करून रागाचें मोठें अवडंबर माजविलें. मी केलेली व्यवस्था कोळ्यांनीं दंगा करून बिघडवून टाकिली, तेव्हां त्यांचा पक्का बंदोबस्त केलाच पाहिजे असा त्यानें दृढ निश्चय केला असें दिसतें. 'श्रीमंत **दादासाहेबांचे** मनांत कितेक प्रकारें संशय वाढत चालिले. पुढें बखेडा मातबर व्हावा असेंही डौल दिसतात. त्यास तुम्हीं तेथें आहा. संशयाची निवृत्ति वरचेवर करून रासीत जावे' असें **नाना फडणिस नाशिकास गोविंदराव तात्यास** लिहितो ( खंड १४।७२ ). यावरून रघुनाथरावानें केवढें अवडंबर माजविलें असेल याची सहज कल्पना येते. रघुनाथ-

रावानें नावडतोच पुरंदरच्या दंगखोर कोळ्यांस नाशिकास बोलावून घेऊन सर्व प्रकरणाची शहानिशा करण्याचा आव आणला. त्याप्रमाणें **कोळी नाशिकास** गेले, त्यांनीं आपली सर्व बाजू दादासाहेबास पूर्णपणें समजावून सांगितली व आपल्याकडे कांहीं एक गुन्हा नाहीं हें सर्व त्यांनीं त्यांस स्वच्छपणें सिद्ध करून दिलें. इतकें झाल्यावर दादासाहेबांचा त्यांच्यावरील राग एकदम नाहींसा झाल्यासारखा दिसतो. कारण त्या सर्व प्रकरणाची छाननी झाल्यावर रघुनाथरावानें कोळ्यांस त्यांचा गुन्हा पूर्णपणें माफ केला. तो आपल्या पत्रांत लिहितो ' ज्या गोष्टी न म्हणाव्या तुम्हीं कबूल न कराव्या त्या गोष्टीचें इमान तुम्हाजवळ राजश्री **आबा** पुरंदरे मागूं लागले तुम्ही कबूल न केले म्हणोन तुम्हासी आकस करून खालीं घालविलें व दुसरे लोक किल्ल्यावर चढविलें. तेव्हां कलेल तसे करून तुम्हास जागा हस्तगत करणें जरूर जाली. म्हणोन तुम्ही केली. त्यामुळें खूनखराब्या जाल्या व बगर हुकूम कितेक वर्तणुका घडल्या त्यास तुम्ही सरकारचें पहिल्यापासून येकनिष्ट इमानी व पुढें आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणार हे जाणोन तुम्हावर कृपा करून सर्व केल्या गोष्टी तुम्हास माफ केल्या आसेत.'- ( पु. द. ३, ३९ ). यावरून दादाचें मनोगत पूर्णपणें कळून येतें. कोळ्यांना उखडून टाकण्यास तयार झालेला रघुनाथराव त्यांची बाजू ऐकतांच इतका खूष होतो कीं त्यास सर्व गुन्ह्यांची माफी करून त्यांस पूर्वीच्या ठिकाणींच स्थापण्यासाठीं सिद्ध होतो. मग त्यानें हा निवाडा करण्याचा सर्व फार्स कोणाकरितां केला? आपल्या प्रेरणेनेंच व इच्छेनुरूपच सर्व गोष्टी घडल्या आहेत तर, त्याबद्दल सान्याला अगर कोळ्यांना शिक्षा कशाकरितां, अशा विचारानेंच त्यानें या सर्व गोष्टी केल्या नसतील कशावरून? -

आणि इतकें करूनहि **दादासाहेब** स्वस्थ बसले नाहींत. त्यानीं **आबा** **पुरंदऱ्यास**ही आपली बाजू समजावून देण्याकरितां **नाशिकास** बोलाविलें होतें; परंतु तो शहाणा, सर्व प्रकार त्याच्या पूर्ण परिचयाचा; आपण नाशिकास गेलो, व आपण आपली बाजू कितीही रंगवून दादासमोर मांडिली तरी कोणताही फायदा होणार नाहीं, हें त्या मुत्सद्यानें पूर्णपणें ओळखिलें होतें. त्यामुळें तो नाशिकास दादाकडे गेलाच नाहीं. उगाच हात दाखवून अवलक्षण करा कशाला? त्यापेक्षां जशा गोष्टी घडतील तशा त्या पहाव्या हाच त्याचा कटाक्ष होता असें दिसतें. तसें पाहिलें तर **आबा पुरंदरे** हा **दादासाहेबांच्या** पक्षाचा, दादासाहेब व आबा पुरंदरे यांचा अगदीं निकटचा स्नेह, आबावर दादांची बहाल मर्जी, हें सर्व जगाला पूर्णपणें माहीत, असें असतांही आबा, दादा बोलावीत असतांही, नाशिकास गेला नाहीं, यांतील इंगित काय? तो तेथें गेला असतां तर दादाला त्यानें आपली बाजू समजाऊन देऊन आपल्यावर कोळ्यांनीं व विसाजी केशव सानें यानें कसा बेअब्रूचा प्रसंग ओढवून आणला हें त्याला सिद्ध करतां आलें असतें. पण त्या बाबतींत त्याची खात्री नव्हती. दादाचा कल कोणाकडे झुकतो आहे हें त्यानें पूर्णपणें ओळखलें होतें व अशा **स्थि-**

तींत आपण जर नाशिकास गेलों तर आपल्यासारखा निकाल दादासाहेब देतीलच अशी त्याला आशा वाटत नव्हती. शिवाय, या सर्व प्रकरणाच्या बुडाशीं खुद्द **दादासाहेबच** आहेत हें ओळखल्याशिवाय तो कसा राहिला असेल? परंतु आपण बोलावूनही आपला स्नेही म्हणविणारा आबा पुरंदरे नाशिकास आला नाहीं यामुळें दादालाही राग येणें साहजिक होते. स्नेहा झाला तरी आबा कांहीं झालें तरी नोकरच.' यामुळें दादाही त्याच्यावर संतापला, चिडला व त्याच्यावर त्यानें शिक्षेचें हत्यार उपसलें. परंतु या कामीं **बापू** आपल्याला मदत करतील अशी **आबाचीही** बळकट आशा होती. '**पुरंदर** गेल्यानें आपला दुर्लौकिक होत आहे, नव्हे, झाला आहे. वडिलांनीं मिळविले तितकें सर्वस्व गेलें. त्यांत बाहेरील मोगलानें अथवा दुसऱ्या कोणी किला घेतला असतां तरी नाकर्तेपणा आबाकडे आला असता. परंतु घरांतील फितुरीमुळें किला गेला व '**खावंदाचे** कत्रिम त्यांत' तेव्हां त्याचें धाबेंच दणाणलें व त्याच्या मनानें धास्त खाली. दादा आपली बाजू उचलून धरितील, **बापूही** आपल्याला मदत करितील अशी जी त्याची आशा तीही जमिनदोस्त झाली. यामुळें आपलें काळें तोंड दादासाहेबास कशास दाखवावें; याच एका विचारानें तो गेला नाहीं असें नसून "**दादासाहेबांनीं** (आपली) ममता सोडून द्रव्याचा लोभ धरून कंसाच्या (त्रिंबकरावमामा पेठे यांच्या) सांगितल्यावरून प्रथम राजकारणें केलीं, लोका (कडून) पैका गोरगरिबाचा घेणार व किल्ला सरकारांत घेणार. तेव्हां तेथें श्रीमंतापाशीं तोंड खाले करून जावे येसी कल्पना आबाच्या चित्तांत येऊन जात नाहीं." हें पत्र **चिंतो अनंतानें**, म्हणजे दादाच्या दुसऱ्या एका जीवश्चकंठश्च स्नेह्यानें धारवाडच्या स्वारींतून लिहिलें असून तें अप्रसिद्ध असल्यानें पुढें दिलें आहे. यावरून **आबाच्या** जीवाची किती कालवाकालव होत होती व **दादासाहेबांनीं** पुरंदर किल्ला घेण्याचे बाबतींत कसकशी राजकारणें चालविलीं होतीं याची माहिती मिळते. एकूण **दादासाहेबच** मूळ सूत्रचालक होता हेंही आबानें ओळखिलें होतें व म्हणूनच तो त्याच्या भेटीस गेला नाहीं हेंहि सिद्ध होतें.

पुरंदर किल्ल्याच्या प्रकरणांत कोणी कोणी काय काय प्रकार केले यांची माहिती दादासाहेबास कळल्यावर त्यानें ती माहिती आपल्या पुतण्यास कर्नाटकच्या स्वारींत कळविली. पुरंदरचे कोळीहि कांहीं स्वस्थ नव्हते. तेही माधवरावास भेटण्यास गेले. त्यांनींही सर्व वस्तुस्थिति पेशव्यास कळविली. "आम्ही पुरातन वतनदार असल्यानें आबानें आम्हास दूर करावयास नको होते. त्यामुळें आम्ही अन्नास मोताद झालो व उपासी मरूं लागलो तेव्हां आम्हांस दुसरा इलाजच नव्हता." अशी त्यांनीं आपली बाजू त्याच्यापुढें मांडिली व आम्हांस माफी करून 'खर्चास पैसे द्यावे, अशीही विनंती केली. **माधवरावानें** 'सध्यां आम्ही स्वारींत असल्यानें या गोष्टींचा निकाल करतां येत नाहीं. परंतु आबास सांगूं व तुमची सोय, पुण्यास

आल्यावर, सर्व चौकशी करून देऊं,' असें त्यांस आश्वासन देऊन व त्यांस कांहीं खर्चास देऊन पुण्यास पाठवून दिले. या एकंदर प्रकारावरून माधवरावानें खरी वस्तुस्थिति काय आहे तें कळविण्याकरितां चुलत्यास पत्रें लिहिलीं. दादानींहि उत्तरें लिहून पुतण्याची खातरजमा करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यावरून पेशव्याची खात्री पटेना. तेव्हां त्यानें या एकंदर प्रकरणांत **विसाजी केशव** साने याचा हात किती, त्यानें किल्ला घेतला तो तुमच्या आज्ञेनें घेतला किंवा नाहीं, आज्ञेशिवाय घेतला असला तर त्याचें पारिपत्य करणें किती आगत्याचें व जरूरीचें आहे वगैरे बाबतींत त्यानें **राघोबास** पत्र लिहून उत्तरें मागविलीं. त्याचें हें पत्र अजून प्रकाशित झालेलें नाहीं. तें नुकतेंच आम्हांस रायरीकरांचें दप्तर चाळीत असतां सांपडलें. तेव्हां तें जसेंच्या तसेंच प्रथम पुढें ठेवतों. हें पत्र ता. २४ जून १७६४ चें असून माधवरावानें **कोपलहून** आपल्या चुलत्यास लिहिलेलें आहे. तें पत्र असें—

श्री { श. १६८६ ज्येष्ठ वद्य १
{ इ. १७६४ जून २४

तीर्थस्वरूप राजश्री **दादासाहेब** वडिलांचे सेवेसी

आपत्ये **माधवरायाने** चरणांवरी मस्तक ठेवून सा। नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता। छ २३ जिल्हेज मुकाम नजीक **कोपल** येथें वडिलांचे आसीर्वादेंकरून सुखरूप असो विशेष वडिली पत्रें पाठविलीं तीं पावोन लिहिला अर्थ सविस्तर कळों आला **धोंडो मल्हार** याजकडील कारकुनानें किला घेतला तेव्हां धोंडोबाचे संदर्भानें घेतला यांत संशये नाहीं ते आपणाजवळ आहेत आपणांस पुसून घेतला किंवा न पुसतां घेतला हें कलत नाहीं न पुसतां घेतला म्हणावा तरी आपण त्यांस फजित करीत नाहीं पुसून घेतला म्हणावा तरी आपण शपतपूर्वक लिहिलें त्यांस तथ्य वर्तमान काय असेल तें लिहून पाठविणें जर आपले आज्ञेसिवाय किला घेतला असिला तर परिछिन त्यास नजरबंद करून किला आबाचे हवाला करावा जर आपण आज्ञा केली असिली तरी आम्हांसी तरी कृत्रीम करूं नये म्हणून आज्ञा केली ऐसीयांस जाला मजकूर पूर्वी शपथपूर्वक सेवेसी लिहून पाठविलाच आहे कचे वर्तमान वडिलास कलावे त्यांस प्रथमता बेरड कृष्णातीरीं आले त्याणीं कित्येक आपले हालहवाल सांगितलें आम्हीं पुरातन वतनदार बहुता दिवसाचे वतनी चाकर असतां आबांनीं आम्हांस दूर केलें पोटांस पावेनासें जाहालें उपासी मरतो त्यांवरून आम्ही त्यांस सांगितलें कीं आम्ही प्रस्तुत मसलतसीर आहो तूर्त तुम्हीं घरास जाणें स्वारीहून आल्यावर आबास सांगून तुमची सोये करून देऊं प्रस्तुत **सखारामपंत** येथें आहेत. त्यांस सांगता सोये निघाली तरी काढितो त्यास ते बोलिलें कीं **बापूस** कलल्यास **आबास** कलेल ते. आम्हांस मारितील

डोकीं मारावयास चुकणार नाहींत याप्रमाणें कितेक हरद्र सांगितलें व कांहीं पोटास मागितलें त्यावरून त्यास खर्चास चयारसे रुपये दिल्हे इतका प्रकार मात्र जाहाला याचें कारण हेंच कीं जुने पुरातन लोक दुसरेकडे जातील याजकरतां आशेस लाऊन ठेविले किला घ्यावयाची वार्ता किमपि त्यांची नाहीं धोंडोबाचें कारकुनानें किला घेतला यामुळें त्यांसहि पुसिलें ते बोललें कीं आम्ही त्यांस किला घ्यावयास सांगितला नाहीं म्हणून शपथ वाहिली आमचा दस्तयेवज निघाल्यास पारपत्य करावें कारकुनानें त्यांस काय समजाविलें काय केलें हें आपणांस ठाऊक नाहीं दुसरे कारकून आमचा किल्यावर गेला तेव्हां आमचें सांगितलें कोणास प्रमाण वाटणार नाहीं आतां चित्तास येईल ते करावे याप्रो ते बोलतात प्रथमता याचा कारकून किल्यावरी गेला हें वर्तमान आम्हांस कलतांच यांस आम्हीं दरबार मना केला व पुढें विसिष्ट कांहीं करावें त्यांस येथें **सखारामपन्तांनी** सांगितलें कीं, तूर्त आब्रू घेवूं नये आबरु राखोन विचारें विचारें आपलें कार्य करावे व आपलेही आज्ञेचा मार्ग पाहावा आज्ञा येईल तसें करावे खालीं पत्रांत नजरबंद करावे म्हणून आज्ञा आली त्यावरून उतमप्रकारें पारपत्य करावे हाच मनसबा केला परंतु सखारामपंत बोलले कीं किला कोठें जाणार आहे महिना दोन महिने अधिक आगले लागले तरी लागतील परंतु मनसुब्यानें काम करावें दरबार मना जालाच आहे तेव्हां नजरबंद दाखल आहेतच मातबर माणसास यापेक्षां अधिक काय पाहिजे त्यावरून थोरले पारपत्य तूर्त राहिलें आहे गरमनरम समजून त्याजपासूनच हे गोष्ट जाली असली तरी विचारावरी येतील लबाडीच करून न आइकत तरी उसीर लागणार नाहीं याचा कारकून किल्ल्यावरी गेला तेव्हां याजकडे मुद्दा लागलासा दिसतो त्यास कचा मजकूर वडिलांस कलावा यास्तव लिहिला असे सारांश वडिलांचे मर्जीपेक्षां दुसरें आम्हांस अधिक वाटावें तर कृत्रीम करावें त्यांस वडिलांचे मर्जीसीच मजला दरकार आहे श्रेयस्कर कल्याण मार्ग त्यांतच आहे हें मजला पुरतें समजलें आहे मी कृत्रीम वडिलासी सर्वात्मना करणार नाहीं. किला हस्तगत करावयाचे प्रकार केले आहेत व पुढेही रोजबरोज तेच विवंचनेंत आहे किला घेवून आबाचे हवाला करावा हाच निश्चय आहे वडिलांनी तिकडून पुस्तपना होईल तो करावा किला आम्हींच घेतला देवूं न देवू येविसीं बहुतांस संदेह आहे त्याचा परिहार सांगितल्यानें निशा पडत नाहीं किला हस्तगत होवून हवाला होईल तेव्हां खरें वाटेल तसा कांहीं वडिलांचा प्रकार नाहीं वडिलांस जें मी लिहीन ते वडिलांस मात्र लटकें वाटणार नाहीं व मीहि लटकें सर्वथा लिहिणार नाहीं येविसीं माझी खातरजमा आहे जाहाले वर्तमान कचे सखारामपंतास सांगितलेंच आहे **धोंडोबाचे** व **बावा सरनाईक** याचें गांव देसी असतील व वतन असेल ते कुल जप्त करावे *सेवेसी श्रुत होय हे *विज्ञापना

---

* अक्षरें भिन्न.

या पत्राला दादासाहेबानीं काय उत्तर दिलें हें समजावयाला कांहीं मार्ग नाहीं; परंतु बिसाजी केशवाचा हात या प्रकरणाच्या बुडाशीं किती होता, आबाची चूक काय झाली, सर्व प्रकरणाची चौकशी करून पुरंदरचे कोळी कसे धुतल्या तांदुळासारखे स्वच्छ व शुद्ध होते, त्यांस आपण कशी माफी केली व किल्ला सरकारच्या ताब्यांत ठेवूं, आबाच्या स्वाधीन करणार नाहीं, वगैरे गोष्टी. त्यानें पुतण्यास खात्रीनें कळविल्या असल्या पाहिजेत. एवढेंच नव्हे तर, त्यानें आपल्या पुतण्यास असेंही कळविलें की, "आम्ही कोलियांस कौल दिल्हा आहे त्याचों तुम्ही आपला देणें." यावरून रघुनाथरावानें आपल्या पुतण्यासही आपल्या बाजूस कसें वळवून घेतलें हें यावरून सहज सिद्ध होतें. शिवाय हें व असल्या तऱ्हेचीं आलेलीं पत्रें माधवरावानें आपला कारभारी सखारामबापू बोकील यांसही दाखविलीं नाहींत किंवा अशींअशीं पत्रें दादासाहेबांच्या कडून आलीं आहेत असेंही त्यानें त्यास सांगितलें नाहीं. यावरून माधवरावानें या बाबतींत आपल्या चुलत्यावर किती विश्वास टाकला होता व त्याला तो किती जपत होता हें लक्षांत धरण्यासारखें आहे. वरील अर्थाचें पत्रही अप्रकाशित आहे. तेंही जसेंच्या तसें पुढें मांडणें जरूर आहे. तें पत्र पुण्याचे सरदार श्री. बाळासाहेब पारसनीस यांच्या संग्रहांत आम्हांस सांपडलें. हें पत्र ता. २३ ऑक्टोबर १७६४ चें असून दादाच्या पक्षांतील एका विश्वासू माणसानें—बहुधा चिंतोपंत देवस्थळी यानें आपल्या पुण्याच्या स्नेह्याला लिहिलेलें आहे. हें पत्र पूर्ण सापडलेलें नाहीं, कारण त्याचा दुसरा बंद गहाळच झालेला आहे; परंतु पुरंदरच्या कोळी-दंग्यासंबंधाचा सर्व मजकूर त्यांत पूर्णत्वानें आहे. धारवाडहून लिहिलेलें हें पत्र असें:—

{ श. १६८६, आश्विन व. १२
{ इ. १७६४ ऑक्टोबर २३

श्रीमंत राजश्री चिंतोपंतदादा स्वामीचें सेवेशी साष्टांग नमस्कार विज्ञापना ता॥ छ २६ रबिलाकर सोमवार मु॥ धारवाड स्वा( मी )चे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष स्वामीकडील पत्रें छ ६ शुद्ध ९ रा॥कर व छ १० रा॥ कर आश्विन शुध १३ व छ १२ रा॥कर शुध १५ मु॥ पंचवटी येसी तिनी पत्रें छ १४ रबिलाकर आश्विन वा॥ १ रविवार घटिका रात्रीस पावली सविस्तर अर्थ ध्यानांत आला श्रीमंत राजश्री बापूनीं सारीं पत्रें वाचून पाहिलीं. श्रीमंताचे स्वदस्तुरचीं पत्रें आली त्यापासून थोडासा संतोष जाहला; परंतु राजश्री आबा जाईनात म्हणून श्रीमंतांची मर्जी क्रूर आहे त्यासी आबाचे लेकुरपण आथवा आरवाली सोसणें श्रीमंतावाचून कोण आहे येके दिवसीच ते कृपा करतील हे बापूही समजले आहे( त ) परंतु रागें मात्र भरावें तथापि पुरंदरामुळें दुर्लौकिक आबाचा जाहला आहे वडिलांनीं जे मिळविले तितके सर्वस्व गेले त्यांत बाहेरील मोगलानें आथवा आणखी कोणी किला घेतल

असता तरी आबाकडे नाकर्तेपणा येते घरांतील फितुरीमुळें किला गेला व **खावं-दाचें** कृत्रिम त्यांत तेव्हां कांहींच इलाज चालत नाहीं. म्हणून येक श्रीमंत राजश्री दादासाहेबाचा मात्र आश्रय मागून होते. तो त्याणीही **आबासाहेबाची** ममता सोडून द्रव्याचा लोभ धरून कंसाच्या सांगितल्यावरून प्रथम राजकारणें केलीं लोका (कडून)... पैका गरीबागुरबाचा घेणार व किला सरकारांत घेणार तेव्हां तेथें श्रीमंतापासी तोंड खाले करून जावे येसी कल्पना **आबाच्या** चित्तांत येऊन जात नाहीं त्याहीमध्यें आबासाहेब तेथें जाते तरी श्रीमंतास याचींच ममता लागती, परभारें राजकारणें न होतीं हेंही खरें परंतु श्रीमंत राजश्री **आबासाहेबावर** व श्रीमंत राजश्री **बापूवरी श्रीमंतांची** पूर्व कृपा हे जघन्य. प्रिथवीवर स्वराज्यांत व परराज्यांत असतां श्रीमंत द्रव्याचा लोभ धरून उभयतांचा दुर्लौकिक करतात व गरीबगुरिबाचें द्रव्य घेणार याजमुळें आपली मंडळी गडबडली होती स्वदस्तुरचीं पत्रें आलीं त्यापासून थोडीसी स्वस्ता जाहली तथापि कंसानीं श्रीमंतांचें पत्र **श्रीमंत राजश्री रावसाहेबास आले कीं आम्ही कोलियास कौल दिल्हा त्याप्रमाणें तुम्ही आपला देणें** येसे वर्तमान येथें ऐकतो श्रीमंतांनीं पत्रें कांहीं **बापूस** दाखविलीं नाहींत सांगितलीं नाहींत सांगितलें असतें तरी **बापू** नको अथवा या हें कांहींच न म्हणते परंतु **खावंदच** चाकरासी कृत्रिम करूं लागल्यावरी इतबारे इमाने चाकरी केल्याचें काय फल याकरितां **बापू** व सर्व मंडळी उदास थोडीसी आहे तथापि बाहेर उदासता कोणीही दाखवीत नाहींत लक्षही टाकीत नाहींत येविसी निशा असो द्यावी सर्व समजले आहेत व चाकरी कोणे प्रकारे करितात परभारें कलेल आथवा श्रीमंत तेथें आलियावरी चवकसीही करितील तेव्हां निदर्शनासही येईल. ... (पुढील मजकूर गहाळ आहे.)

या पत्रावरून खालील गोष्टी उघड होतात. पुरंदरच्या कोळ्यांचा दंगा माधवराव-निर्मित नसून तो रघुनाथरावनिर्मित होता. रघुनाथरावानें आबा पुरंदऱ्याकडे दिलेला पुरंदर किल्ला सरकारांत घेण्याचा राजकारणी डाव टाकला व तो यशस्वी करून दाखविला. या कामीं दादानें माधवरावालाही पूर्णपणें आपलासा करून घेऊन आंत येक व बाहेर जाहिराणा येक दर्शविण्यास सांगितलें व पेशव्यानें त्याप्रमाणें चोख वर्तन केलें. **विसाजी केशव साने** हा रघुनाथरावाच्या शिकवणुकीनेंच पुढारला व 'थोरले श्रीमंतांचा' आश्रय मिळाल्यामुळेंच तोही या प्रकरणांत फंदफितुरी करण्यास सिद्ध झाला. **रघुनाथरावानेंच** कृत्रिम करण्यास सुरवात केल्यानें त्याच्या बाजूची सर्व मंडळी गडबडली व त्यास 'अंदरकी बात' माहीत असूनही त्यांनीं 'नरो वा कुंजरो वा' असें म्हणून कानावर हात ठेविले. नाहातर सखाराम **बापूसारखा** चाणाक्ष मुत्सद्दी, स्वतःचा स्वार्थ बाजूस सारून, या प्रकरणीं इतका मुग्ध राहिलाच नसता; व **धोंडोपंत** पुरंदऱ्यावर शिक्षेचें हत्यार उपसण्यास पेशवा तयार असताही त्यानें त्याचें निवारण केलें नसतें.

आतां प्रश्न असा उरतो कीं, माधवरावानें या प्रकरणांत दादाचाच पाठपुरावा कां केला; घोडनदीच्या लढाईनंतर रघुनाथराव सर्वाधिकारी झाला व त्यानें त्यावेळीं जो बक्षीससमारंभ उरकून घेतला त्यावेळीं आबा पुरंद्ऱ्याकडे पुरंदरचा किल्ला दिला ही गोष्ट इतरांप्रमाणेंच माधवरावालाही पसंत नव्हती. परंतु चुलत्याशीं नुकताच संधि झालेला असल्यानें माधवराव त्यावेळीं कांहींच बोलला नाहीं. व 'वडिल' जी गोष्ट करितील त्याला तो 'हो हो' म्हणत गेला. पुढें मागें पुरंदर किल्ला सरकारांत घेण्याची कल्पना त्याच्या मनांत त्यावेळीं तरी नव्हती हें खास. परंतु पुढें पुढें माधवरावाच्या कारभाराची घडी जसजशी बसत चलली तसतशी त्याच्या सल्लागारांनीं पुरंदर किल्ला सरकारांत घेण्याबद्दलचा सल्ला त्याला दिला असावा. ही गोष्ट माधवरावास जरी पटली असली तरी ती करण्यास तो फारसा उत्सुक नव्हतासें दिसतें. कारण 'वडिलास दुखवूं नये' असेंच त्याचें सर्व धोरण होतें. आणि त्याचें हें धोरण त्यानें रघुनाथरावाला लिहिलेल्या पत्रांत अगदीं स्पष्ट केलें आहे. तो लिहितो, 'मजला आपण वडील असतां दौलतेची व कर्जाची व नांवलवकिकाची किमपि चिंता वाटत नाहीं. वडील जें करणें तें करितीलच ऐसें मानून निश्चित आहे. नाहीं तरी सरदार डोईजड व पत कोठेंच राहिली नाहीं. कोण्हासी चाकरीकरितां नेट धरून बोललियास वडिलास विपरीत प्रदर्शन करून तत्काळच घरांत पेच पाडून राहिली तीही दौलत बुडवावयास सिद्धच आहेत........ दौलतीचा बंदोबस्त करणार वडील समर्थ आहेत, कांहीं चिंता नाहीं. आम्ही आज्ञेप्रमाणें वर्तावें, सेवा करावी यांतच इहलोक-परलोक आहे. पुढें वडिलास जसें कर्तव्य करणें असेल त्याप्रमाणें सूचना लिहावी." (खंड १४, ५६) यावरून पेशवा आपल्या चुलत्यास कसा तळहाताच्या फोडाप्रमाणें जपत होता हेंच सिद्ध होत नाहीं काय ? कर्नाटकच्या स्वारींत असतां पुरंदरच्या कोळ्यांनीं दंगा केला ही गोष्ट माधवरावास कळल्याबरोबर त्यानें चिंतो विठ्ठलास लिहिलें 'हे गोष्ट आम्हास किमपि ठाऊक नसतां मधीं लबाडी करून कर्म केलें, त्यांचें पारपत्याविशीं तीर्थरूपांस लिहिलें आहे.' (खंड १३, ८२) असें प्रांजलपणें लिहिणारा माधवराव हें सर्व प्रकरण आपल्या चुलत्यानें हातीं घेतलें आहे व त्याचा न्याय तो निःपक्षपातिपणानें देईल अशी त्याची खात्री होती. हें प्रकरण आपल्यामुळें उत्पन्न झालेलें नाहीं; तसा चुलता कदाचित् संशय घेईल तर तो विनाकारण होय, असेंही पेशव्यानें आपल्या आईस लिहिलें होतें (खरे ४३४) व तशा प्रकारचा निर्वाळा त्यानें आपल्या स्वारींत असमान्या चुलत्याच्या पक्षाच्या लोकांस दिलाही होता. व त्यामुळें ते सर्व स्वस्थचित्त होते. (खरे ४३५ व ४४८) अशा तऱ्हेची सर्व वस्तुस्थिति असतां रघुनाथरावानें सर्व कच्चें वर्तमान पेशव्यास कळविलें; त्याच्या मनाचा व धोरणाचा थांगपत्ता समजून घेतला व त्याला त्रिंबकरावमामाच्या करवीं लिहून कळविलें कीं, 'आम्हि कोळियांस कौल दिल्हा तसा तुम्ही देणें.' हें लिहून येतांच चुलत्याच्या सर्व धोरणाचा

मथितार्थ माधवरावासारख्या शाहण्या पेशव्याच्या ध्यानांत येण्यास फारसा अवधि लागला नाहीं. ही गोष्ट चव्हाट्यावर झाली तर बरी नव्हे असेंही त्यानें हेरलें व इतर अनेक राजकीय गोष्टींची सखाराम बापू वगैरे मुत्सद्यांशीं उघड उघड चर्चा करणारा पेशवा, चुलत्याचा असा इषारा मिळतांच बापूशीं पुरंदरच्या बाबतींत एक चकार शब्दही बोलला नाहीं किंवा त्यानें रघुनाथरावाचें वरील पत्र त्याला वाचावयासही दिलें नाहीं. या बाबतींत गुप्तता ठेवणेंच इष्ट होय असें त्यानें आपल्या मनाशीं ठरविलें व सर्व भार चुलत्यावर टाकून तो स्वस्थ बसला. एकदां एकाकडे एक काम सोपवून दिल्यावर व तेंही आपल्या चुलत्याकडे सोपवून दिल्यावर, त्यांत ढवळाढवळ करून त्याचा विचका करणारा माधवराव नसल्यानें 'वडिलीं केलें तेंच योग्य' असें समजूनच सर्व गोष्टींची त्यानें गुप्तता राखिली व पुढें स्वारींतून परत आल्यावर दादाच्या सल्याप्रमाणेंच त्यानें त्यांच्याशीं करार केला. यांत पेशव्यानें दोन गोष्टी साधल्या. एक म्हणजे दादाच्या म्हणण्याला मान तुकवून त्यानें असें दाखवून दिलें कीं चुलता व मी एक आहोंत. यामुळें राज्याचा आब राहून त्याची प्रतिष्ठा वाढली, एकास एक व दुसऱ्यास दुसरें असें सांगून व मध्यें लुडबुड करून स्वतःचा स्वार्थ साधणाऱ्यांस धास्त उत्पन्न केली व चुलत्याबरोबरच त्यानें आपली प्रतिष्ठाही वाढविली. दुसरें असें कीं, पुरंदर किल्ला स्वतः दादास व आबासही न दुखवितां अनायासें सरकारांत स्वाधीन झाला. नाहींतर तो किल्ला त्याची कितीही इच्छा असती तरी, वरील दोघांस दुखविल्याखेरीज, सरकारच्या ताब्यांत कधींच आला नसता. या दृष्टीनें त्याचा हा एक राजकारणी डाव होता असें एक वेळ म्हटलें असतां चालेल; परंतु पुरंदर किल्ला कोळ्यांस व विसाजी केशव साने यांस फितूर करून त्यानें सरकारांत घेतला तो पेशव्याचा एक राजकारणी डाव होता हें म्हणणें फारसें टिकत नाहीं. कारण उपलब्ध सर्व पुरावा या सिद्धांताच्या उलट आहे.

अशा तऱ्हेनें पेशव्यानें दादाचा मान राखण्याकरितां त्याच्या बेतांबद्दल गुप्तता राखून त्याची परिस्फुटता केली नाहीं. हें ज्यांस समजलें नाहीं, त्यांनीं माधवरावास या जाळ्यांत अडकविण्याचा प्रयत्न करून त्यास थोडाफार दोषही दिलेला दिसतो. त्यांचें म्हणणें असें कीं, श्रीमंतांनीं सर्व चोकशी केल्यावर दोघांसही सर्व गोष्टींचा खुलासा स्वतः पत्रें लिहून करणेंच इष्ट होतें. त्या कामीं दिरंगाई झाल्यानें "संदेहानें संदेह होऊन एवढा लाभ हातचा जातो. या गोष्टीविशीं जशी पा तशी निशा करून दोन्ही चिठ्या मात्र घेऊन पा" (खंड १४, ६८). आतां ही टीका करणारास रघुनाथरावाच्या कटांतील 'अंदरकी बात' माहिती नव्हती व माधवरावानें गुप्तता कां राखिली त्याचें मर्महीं अशा टीकाकारास समजणें शक्य नव्हतें. अर्थात् तें कारण कोणासही न उमग-

त्यानेंच रघुनाथरावाला **नारो कृष्ण दरवे** यास पत्रीं लिहून कळविलें आलें कीं "आमचा पुस्तपन्हा आहेसा कोणासही न कळो देतां जसें चिरंजिवांनीं पुरंदरचे आत एक व बाहेर जाहिराणा एक दर्शविला होता तसें करावें." (पे. द. १९, ५२) **दादाच्या** उपदेशांतील प्रत्येक शब्द महत्त्वाचा व त्याच्या खोल मनाचा ठाव सहज समजेल असा आहे. त्या उपदेशांत त्यानें निःसंदिग्धपणें दाखविलें कीं पुरंदर प्रकरणीं (१) आमचा पुस्तपन्हा होता (२) तो आहेसा माधवरावानें कोणासही कळूं दिला नाहीं व (३) मी सांगितल्याप्रमाणेंच त्यानें आंत एक व बाहेर एक असा जाहिराणा केला. इतका उघड उघड कबुलीजबाब दादानें क्वचितच दिला असेल! असा हा निखालस कबुलीजबाब असतां दादाला भोळा सांब समजून त्याला पुरंदर-प्रकरणीं निर्दोषी समजून माधवरावाच्या आंगींच 'राजकारणाचा डाव होता' असा दोष चिकटविणें म्हणजे चोराला सोडून संन्याशालाच फाशी देण्यासारखें होणार आहे. तात्पर्य, इतकेंच कीं, पुरंदर प्रकरण हा एक राजकारणी डाव होता हें सत्य होय; परंतु त्याचा मुख्य सूत्रधार माधवराव किंवा विसाजी केशव नसून **रघुनाथराव** हेंच होय.

रघुनाथरावानें तरी हा राजकारणी डाव, आबा पुरंदऱ्यासारख्या आपल्या जिवलग मदतनिसास दुखवून, कां टाकला? या प्रश्नाचें उत्तर वाटतें तितकें सोपें नाहीं. प्रथम हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, रघुनाथराव पुरंदर किल्ला आबाच्याकडे सोपविण्यास तयार नव्हता. त्याला तो किल्ला आपल्याकडेच ठेवावयाचा होता. पुरंदर किल्ल्याचें महत्त्व तो पुरेपूर ओळखून होता. असें असतां त्यानें तो किल्ला आबा पुरंदऱ्याकडे खुशासुखी दिला काय? याचें उत्तर नाहीं असेंच द्यावें लागतें. **सखारामबापूनें** भीड घातली कीं, पुरंदर किल्ला आबाकडे सोपवावा आणि त्यावेळीं बापूची भीड मोडून स्वतःचेंच घोडें पुढें दामटण्याइतका मनाचा खंबीरपणा दादाच्या आंगी नव्हता. पुतण्याच्या हातची सत्ता आपल्या हातीं येण्याचे कामीं बापूनें रघुनाथरावाला कसकशी मदत केली, त्यानें कोणकोणत्या उलाढाली केल्या, कोणते डावपेच त्यानें लढविले व शेवटीं यश मिळवून त्यानें माधवरावास कसें शरण येण्यास लाविलें हें रघुनाथराव ओळखून होता. अशा आपल्या निकटवर्ती साहाय्यकर्त्या मुत्सद्याची भीड मोडणें त्यास मुष्किलीचें झालें व म्हणूनच त्यानें बापूच्या सांगण्यावरून पुरंदर किल्ला आबाच्या स्वाधीन केला. परंतु पुतण्याबरोबर **बापू** कर्नाटकाच्या स्वारीवर निघून गेल्याबरोबर दादानें आपला हेतु साध्य करून घेण्यास सुरुवात केली. त्यानें आबास **नाशिकास** बोलावून घेतलें व त्याच्या गैरहजेरींत विसाजी केशव सान्यास पुढें करून सर्व बार भरला व कोळ्यांस दंग्याचे कामीं सर्व प्रकारें साहाय्य करून पुरंदर किल्ला काबीज केला. पुढें आबाजी सासवडीं गेल्यावर दादानें सर्व गोष्टींचा न्याय-निवाडा केल्याचा निव्वळ फार्स केला व **विसाजी केशव** व कोळी यांस अभयाचा

कौल दिला व तसें करण्याचें आपल्या पुतण्यास बजावून ठेविलें. असा बनाव केल्यानें दादाच या कटाच्या मुळाशीं आहे हें कोणासही कळणें शक्य झालें नाहीं. अशा तऱ्हेनें कट यशस्वी झाला पण त्याचा जो मुख्य हेतु--म्हणजे पुरंदर आपल्या हातीं ठेवणें--तो मात्र तितकासा साधला असें दिसत नाहीं. पुढें मागें पुतण्याशीं दोन हात खेळण्याचा प्रसंग आल्यास दादास पुरंदर पाहिजे होता. आबाच्या ताब्यांत म्हणजे त्याच्या एका पक्षपाती गृहस्थाच्या ताब्यांत-पुरंदर असणें म्हणजे तो त्याच्याच ताब्यांत होता असें सकृद्दर्शनी वाटतें. पण वस्तुस्थिति थोडी निराळी होती. माधवराव धूर्त होता हें रघुनाथरावानें ओळखिलें होतें. तेव्हां तो धूर्त पेशवा आबाला वश करून घेऊन सर्वच डाव उलटवावयचा! तेव्हां दादानेंच तो डाव खेळला व आबाकडचा किल्ला काढून तो सरकारांत ठेवून घेतला. त्याचें चुकलें-किंवा माधरावानें हुकविलें असें समजा--इतकेंच कीं पुरंदर किल्ला त्याच्या हातीं न राहतां तो पेशव्याच्या ताब्यांत गेला!

या सर्व गोष्टींचा अर्थ इतकाच कीं पुरंदरप्रकरण यदृच्छेनें घडलें नसून, तें पूर्व-संकेतानें विवक्षित ध्येय पुढें ठेवूनच सिद्ध झालें. मात्र या राजकारणी कटाच्या मुळाशीं माधवराव नसून त्याचा चुलता **रघुनाथरावच** होता हें निखालस सत्याच्या पुराव्यानें सिद्ध होत आहे.

---

# ६ तांडव गणपति

[ लेखक-कै. ल. ना. जोशी, पुणें. ]

जारण, मारण व उच्चाटन या अथर्ववेदीय ‘ कृत्या ’ शास्त्रापैकींच- ‘ तांडव-नृत्य गणपति ’ हें एक प्रकरण असून, त्याचा संबंध श्रीमंत दादासाहेब रघुनाथराव पेशवे यांच्याशीं असल्यानें या विषयाची माहिती सांगतों.

श्रीमंत राघोबादादा साहेब पेशवे यांची जी जन्मकुंडली मला इतर कांहीं कुंड-ल्यांसमवेत मेणवली दप्तरांत उपलब्ध झाली आहे ती अशी:—

श्रीशालिवाहन शक १६५६ ( सन १७३४ ) आनंदनामसंवत्सरे श्रावण शुद्ध १२ गुरुवार सूर्योदयात् गत घ. ४२ प. १० इत्यादि, मकर राशी-जन्मस्थान माहुली.

रघुनाथराव दादासाहेब यांची जन्मकुंडली:—




ही कुंडली आजपर्यंत कोठेंच प्रसिद्ध झालेली नाहीं. फक्त दादासाहेबांचा जन्म-शक, तिथि आणि जन्मस्थान एवढ्याच गोष्टी प्रसिद्ध झालेल्या आहेत आणि त्या वरील कुंडलीशी जुळत्या आहेत. मात्र या कुंडलीचें फलित काय आहे तें ज्योतिष्यांनीं वर्तवून सांगावें म्हणूनच ही कुंडली मुद्दाम येथें दिली आहे. ज्या स्थळीं मला ही कुंडली मिळाली तें स्थळ विश्वसनीय म्हणजे नाना फडणविसांचें मेणवलीचें दप्तर हें आहे. शिवाय त्या दप्तरांतल्या आणिक ज्या कांहीं कुंडल्या आहेत, त्यांच्याशीं प्रसिद्ध असलेल्या, किंचित् फरकानें पूर्णपणें जमतहि आहेत. यास्तव कुंडलीविषयीं अविश्वसनीयता वाटत नाहीं. या शिवाय दादासाहेबांचें चरित्र प्रसिद्धच आहे. त्याच्याशीं या कुंडलीचा कसा काय मेळ बसतो, एवढेंच काम होरागणितज्ञांचें आहे व तें ते करतील अशी मला आशा आहे.

रघुनाथराव दादासाहेब पेशवे हे जरी शूर पुरुष होते असें म्हणावयाचें तरी त्यांचा स्वभाव फार भोळा होता. ते अत्यंत द्रव्यनाशक होते. कपटपटु आणि तोंडपुजे स्वार्थी लोक त्यांना भावी थोरपणाचें प्रलोभन दाखवून त्यांच्याकडून पैका उकळीत. दादांचा स्वभाव स्तुतिप्रिय असल्यानें आणि त्यांच्या अंगीं दूरदृष्टि नसल्यानें त्यांची नेहमीं पैशाची तंगी होई. राज्यकर्त्याला आवश्यक असणारा जो पात्रापात्रविचार तो त्यांच्या अंगीं बिलकुल नव्हता. राज्य कारभार करणाऱ्याला मनुष्याचा प्रकृति-स्वभाव ओळखण्याची कला व योग्य वेळीं योग्य विचारानें वागण्याची त्यांच्या अंगीं पात्रता हीं नव्हती. त्यामुळेंच ते स्ववचननिष्ठ नव्हते. ते राज्याचे पूर्ण अभिमानी होते, पण स्वार्थी लोकांच्या संगतीनें ने वागत. त्यांचे सल्लागार घरफोडे आणि स्वार्थसाधु असल्यानें व त्यांना स्वतःला विचारपूर्वक वागण्याचा सराव नसल्यानें ते अखेरीस दीनावस्थेंत जाऊन पोंचले. स्वपराक्रमापेक्षां मंत्रतंत्र—जादुटोणे यांवरच त्यांचा भार फार असे. मंत्रतंत्रानेंच

आपली महत्त्वाकांक्षा सिद्धीस जाईल असा त्यांचा मानसिक विकास होता. नानासाहेब आणि भाऊसाहेब ह्यात होते तोंपर्यंत फाजील महत्वाकांक्षेच्या नादीं ते लागले नाहींत. हे दोघे होते तोंपर्यंत त्यांचा एकस्याचा अव्यवस्थित असा अफाट खर्च भागविला जात होता. त्यांच्या पश्चात् त्या गोष्टीला बराच आळा पडल्यानें, त्यांच्या मनांत वाटणीची कल्पना त्यांच्या सल्लागारांनी भरवून दिली आणि त्या दोघांच्या पश्चात्, घरांत आपणच काय ते आतां सर्वश्रेष्ठ उरलों आहोंत, ह्या अभिमानानें त्यांचें मस्तक त्रस्त झालें. आपली इच्छा व आपली महत्वाकांक्षा तृप्त करून घेण्यासाठीं ते मंत्रतंत्राचे प्रयोग अधिक तीव्रतेनें करूं लागले. ते मूळचे स्वतः सूर्योपासक होते. रोज प्रातःकाळीं ते जळजळीत पाण्याचे एकशेंआठ अर्घ्य सूर्याला देत असत, त्यामळें त्यांच्या करपल्लवांची आंतील अंगं, दोन्ही तळहात काळे ठिक्कर पडलेले होते. पण त्यांचे तोंडपुजे लोक तें औदार्याचें, दातृत्वाचें लक्षण असल्याचें त्यांना सांगून त्यांचें समाधान करीत. थोरल्या माधवरावांच्या हयातींत दादासाहेबांचीं तांत्रिक अनुष्ठानें विशेष जोरांत आलीं नव्हतीं. पण त्यांच्या पश्चात् नारायणराव पेशवेपदावर आल्यानंतर, तीं विशेष जोरांत सुरूं झालीं. सखारामबापूंना आपण पेशव्यांचे पेशवे व्हावे अशी फार दिवसांची लालसा होती. ती पूर्ण करून घेण्यास राघोबावांचून इतर कोणी पेशवा असण्यानें भागण्याजोगें नव्हतें. म्हणून त्यानीं राघोबाच्या मनांत स्वतः पेशवा होण्याची महत्वाकांक्षा उत्पन्न केली व ती पार पाडण्यास राघोबा एखाद्या उत्तम मांत्रिकाचा शोध करूं लागला. मराठेशाहीच्या दुर्दैवानें तशा प्रकारचा एक कोत्रकर या आडनांवाचा म्हैसूर प्रांतांतला ब्राह्मण भेटला व त्यानें दादासाहेबाला तांडवनृत्यगणपतीचें अनुष्ठान करण्यास सांगितलें व त्या अनुष्ठानाकरितां एक गणपतीची पच्चावर कोरलेली प्रतिमा देऊन अनुष्ठानाची माहिती सांगितली. ह्याबद्दल दादासाहेबांनीं त्या ब्राह्मणाला मुठानदीच्या कांठीं शेखसल्याच्या शेजारीं पुण्यास एक सुंदर दुमजली हवेली नवी बांधवून राहण्यास दिली. ती हवेली आतां जरी नव्या लॉइड पुरांत गडप झाली आहे, तरी तिच्यांत लाकडावर किती सुंदर नक्षीकाम केलें होतें त्याची साक्ष म्हणून कांहीं उत्कृष्ट नमुने प्रदर्शनगृहांत मुद्दाम सरकारनें राखून ठेविले आहेत. ते फारच प्रेक्षणीय आहेत.

कोत्रकर मांत्रिकानें दादासाहेबांना जी तांडवनृत्यगणपतीची प्रतिमा, उपासनापूर्वक अनुष्ठान करण्यास दिली ती दीडदोन विती लांबीरुंदीच्या पंचधातूच्या जाडसर पच्यावर गणपति तांडव करतो आहे अशा स्वरूपाची कोरलेली आहे. नारायणराव पेशव्यांचा खून झाला त्यावेळीं दादासाहेब ह्याच अनुष्ठानांत गुंतलेले होते. स्वतःस पेशवाई मिळावी म्हणून दादासाहेबांनीं हें अनुष्ठान सुरू केलें होतें. हें त्यांचें अनुष्ठान चालू असतांच नारायणरावांचा खून झाला; आणि आपण उपासना करीत असलेल्या तांडवनृत्य गणपतीच्या अनुष्ठानानेंच ही जारण-मारणोच्चाटनाची सिद्धी प्राप्त झाली

अशी राघोबाची समजूत होऊन गेली. नंतर तो गणपति बाजूला राहून राघोबांनीं पेशवेपद धारण केलें. सखारामबापूला दादासाहेब आपला शागीर्द म्हणत, पण तेच त्याचे उलटपक्षीं शागीर्द बनले. त्यांना आपला कारभारी नेमण्याचें त्यांनीं ठरविलें. परंतु इतर मुत्सद्यांचा जो कट झाला होता, त्यांतला वडीलकीचा मान त्यांना मिळाल्यानें व दादासाहेबांचें पेशवेपद टिकाऊन धरण्याची धूर्ततेची बुद्धि त्याच्या अंगीं असल्यानें त्यानें ती गोष्ट नाकारल्यासारखीच केली. ह्या भानगडींत सखाराम हरि गुप्ते ह्या नांवाचे एक अंबेगांवकर प्रभु गृहस्थ त्यांचे सल्लागार म्हणून पुढें आले. पण यापुढें त्यानंतर घडलेल्या इतर ऐतिहासिक गोष्टींची हकीकत सांगायाची नसून केवळ तांडवनृत्य गणपतीचीच हकीकत पुढें काय झाली तें सांगतों.

पेशवाईपद धारण करून दादासाहेब स्वारीवर निघून गेल्यावर त्यांच्या शिष्यवर्गांत जो एक शेडाणीकर नांवाचा शिष्य मागें राहिला त्यानें ती गणपतीची प्रतिमा लांबिवली व आपल्या शेडाणी गांवांतल्या एका पिंपळाच्या झाडाखालीं नेऊन ठेविली. पुढें कांहीं दिवसांनीं तेथून तो गणपती जो अदृश्य झाला तो साताऱ्यास एका ब्राह्मणाच्या घरीं असलेला उघडकीस आला. यावरून तो गणपति त्याच ब्राह्मणानें महत्त्वाकांक्षेस बळी पडून साताऱ्यास शेडाणीहून आणला असावा, अशी लोकांची समजूत झाली. पुढें सुमारें चाळीस पन्नास वर्षांपूर्वी साताऱ्याचे प्रसिद्ध गोडबोलेशास्त्री संन्याशी स्वामी यांच्या स्वप्नांत तो गणपती गेला. हे गोडबोले स्वामी राजश्री कामत या आडनांवाच्या एका सारस्वत ब्राह्मण गृहस्थाचे गुरु असल्यानें त्यानीं त्या गणपतीचा शोध करण्यास सांगितलें. राजश्री वामनराव कामत यांनीं शोध करून तो गणपति एका जुनाट विहिरींत टाकून दिला असल्याची माहिती मिळविली, तो विहिरींतून बाहेर काढण्याच स्वामींना दोनदां दृष्टांत झाला; त्यामुळें तो बाहेर काढण्याची शिष्य कामत यांना त्यांनीं निकड लाविली. परंतु तो जेथें जातो तेथें त्या घराण्याचें निःसंतान करतो अशी बातमी लागल्याची हकीकत कामतांना जरी सांगितली, तरी त्यानीं त्यांच्याकडून तो हट्टानें विहिरींतून बाहेर काढविला व त्याची रोज आपले घरीं पूजा करण्यास सांगितलें. गुरूची आज्ञा प्रमाण मानून वामनराव कामतांनीं तो गणपति विहिरींतून काढवून आपल्या घरीं आणिला व त्याची पूजाअर्चा सुरू केली. पूजाअर्चा सुरू झाल्यापासून वामनरावांच्या कुटुंबांतील माणसें एकामागून एक अशीं पांच सहा वर्षांत खलास होऊन, शेवटीं एकटे वामनराव कामतच शिल्लक राहिले व तेहि चारपांच वर्षांपूर्वी कैलासवासी झाले. त्यांच्या मागें त्यांच्याच घरांत राहात असलेल्या एका वृद्ध सारस्वत स्त्रीनें त्या गणपतीची पूजा करण्याचा क्रम सुरू ठेविला आहे. वामनराव कामतांचा निर्वंश झाला., तसा आणखीहि कांहींचा झाल्याची वदंता आहे. कामतांचें घर

साताऱ्यास शनिवार पेठेंत असून, त्यांच्या घराच्या ओसरीवरील एका भिंतीच्या कोनाड्यांत ही तांडवगणपतीची मूर्ति ठेविलेली आहे.[1]

एकंदरींत काय कीं, गाणपत्य असून त्यांच्या एका कुंभकारानें गणपतीच्या सेवेचा उपयोग दुष्कार्यासाठीं केल्यानेंच राघोबादादांच्या आयुष्याचें पर्यवसान तांडवनृत्यांतच शेवटीं झालें व शूरवीर दुर्दैवी ठरला.

---

[1] ह्या मूर्तीविषयीं सातारा येथील ज्ञानवृद्ध व सज्जन श्री. रु. के. कोल्हटकर ह्यांस विचारितां त्यांनीं कामत यांचे घराचा पत्तासुद्धां काढला व कळविलें कीं, ही तांडवनृत्य गणेशाची मूर्ति पत्र्यावर कोरलेली नसून पितळेची व फूट दीडफूट उंचीची आहे. फुटक्या तळ्याच्या दक्षिणेस माटे-राममंदिरासमोर, कामत यांचें घर होतें. कामत ह्यांच्या गुरुभगिनी ताई चिपळूणकर ह्यांनीं ब्राह्मणाकरवीं त्या मूर्तीची सांप्रत पूजा चालू ठेविली आहे. ही मूर्ति पुण्याहून वाईस, नंतर साताऱ्यास, नंतर चिंचवड पुनः सातारा अशीं ह्या मूर्तीचीं स्थलांतरें झालीं. बाकी मूर्तीचा लौकिक जो वर आला आहे तो बरोबर आहे. श्री. कोल्हटकर यांचें त्यांनीं ही माहिती कळविली ह्याबद्दल अत्यंत आभारी आहों.

# ७ चौगुला

(श्री. शंकर नारायण वत्सजोशी, वांईकर)

[1] पाटिलकी संबंधानें व [2] देशमुखी संबंधानें मागें मीं कांहीं विचार मांडले; आज चौगुलकीविषयीं कांहीं माहिती देण्याचें योजिलें आहे.

आतांपर्यंत निरनिराळ्या कोशग्रंथांतून—शब्दकोश, ज्ञानकोश, व्युत्पत्तिकोश—किंवा इतिहासग्रंथांतून अथवा खेडेगांवासंबंधीं माहिती देणाऱ्या ग्रंथांतून चौगुल्या-संबंधी माहिती आली आहे. पण ती केवळ शब्दार्थ सांगण्यापुरती आहे. क्वचित् कोठें त्याची गत वा चालू परिस्थिति त्रोटकपणें सांगितली आहे म्हणजे केवळ शब्दार्थां-पेक्षां कांहीं ओळींनीं अधिक, अशी माहिती आली आहे. पण चौगुल्याच्या वेतनाबद्दल किंवा वतनाबद्दल, गांवकीबद्दल, गांवकींतील त्याच्या स्थानाबद्दल, तसेंच त्याच्या कामाबद्दल साधार व त्यांतल्या त्यांत स्वतंत्र तो विषय असें समजून कोणीं कोठें सविस्तर अशी चर्चा केलेली मला आढळली नाहीं. जी थोडी माहिती आली आहे, तीहि परस्पर विसंगत आहे.

डफ (१८२६), मोल्स्वर्थ कोश (१८५७), गांवगाडा–अत्रे कृत (१९१५), ज्ञानकोश (१९२४–२५), शब्दकोश (१९३४) इ. ग्रंथांतून जी माहिती आहे तींत डफ व डफचा अनुवाद करणारे आणि गांवगाडा व त्याचा अनुवाद करणारे असे सामान्यतः दोन प्रकार दिसतात. 'चौगुला' ह्या शब्दापुढें (ज्ञा. को. भा. १३) डफवरून माहिती दिली आहे (च २१८–२१९) आणि 'अलुती बलुती' ह्या शब्दापुढें (ज्ञा. को. भा. ७ अ ५२७) गांवगाड्यावरून माहिती सागतांना चौगुल्याबद्दलहि कांहीं ओळी दिल्या आहेत. डफचें लिहिणें अपुरें, फार थोडें, त्रोटक आहे, पण इतिहासाला धरून आहे; आणि गांव–गाड्यांतील माहिती चालू वहिवाटीची ओळख चांगली पटवून देणारी असली तरी तींत इतिहास फारच कमी आहे, नाहींच म्हटलें तरी चालेल! आणि जो थोडासा आहे तो चुकीचा आहे. गांवगाड्याची भाषा शुद्ध मराठी व अतिशय चटकदार आहे हें खरें;

१ त्रै० वर्ष १३ अं. २. २ त्रै० व २४ अं. २ = ऐ. सं. नि. भा. १ पृ. ५९ ते ७४.

पण तींत ठिकठिकाणीं इतिहासविषयक ज्या संज्ञा उलगडून दाखविल्या आहेत व त्या दृष्टीनें जें विवेचन केलें आहे तें बहुतेक चूक आहे. ह्या संबंधीचीं कांहीं उदाहरणें पहा. सरंजाम व जहागीर ह्यांतील फरक सांगतांना अत्रे म्हणतात, " मुसलमानांनीं दिलेल्या इनामांना जागीर किंवा जहागिर म्हणत व मराठ्यांनीं दिलेल्या इनामांना सरंजाम म्हणत" पृ. ३९. हे दोन्ही चूक आहे. विशेष विवेचन नको. पृ. ४३ वर देशाधिकारी संज्ञेची फोड त्यांनीं केली आहे. 'जमेदार, दरकदार व प्रांत-वतनदार ह्यांना बहुमानार्थी देशाधिकारी म्हणण्याचा संप्रदाय असे.' वस्तुतः असा संप्रदाय मुळींच नव्हता. देशाधिकारी हा वतनदार नाहीं; तो सरकारनें नेमलेला सुभ्यावरील अंमलदार आहे व म्हणून त्यास सुभेदार म्हणत. सुभेदार ह्या फारसी शब्दाला मराठींत देशाधिकारी ही संज्ञा योजिलेली आहे इतकेंच. ह्यांत बहुमान वगैरेचा कांहीं संबंध नाहीं. जमीदार व दरकदार हे तर अगदींच भिन्न आहेत व त्यांना देशाधिकारी मुळींच म्हणत नसत. 'बाजे वतनदार' ह्या शब्दाबद्दलहि असेंच लिहिलें आहे पृ. ४५. 'बाज म्हणजे संपादन केलेला, गुणी, जसे तालीम-बाज.' वस्तुतः 'बाजे' म्ह० इतर; मुख्याहून दुसरे ते, अवांतर, वरकड, गौण. बाजे लोक, बाजे मरातब, बाजे वतनदार इ. इ. पृ. ४९ वर वेठबेगार ह्यांतील बेगार ह्या शब्दाचा अर्थ दिला आहे. कला किंवा विशेषसें ध्यान नको त्यांना बेगार म्हणतात. सोनार व पोतदार ह्याविषयीं लिहिलें आहे. पूर्वी टांकसाळी नव्हत्या. सबब खरे खोटें नाणें ओळखणें कठीण पडे. हें ध्यानांत आणून गांवानें सरकारी आणि खाजगी देण्यातलें नाणें पारखण्याला व जिम्मा घेण्याला सोनार उभा केला व त्याच्या हुद्याला पोतदार नांव ठेविलें पृ. ५२. पोतदार हा सर्वत्र सोनारच असे असें नाहीं. तात्पर्य, अशा पुष्कळच चुका इतिहास दृष्टीनें पाहतां त्या ग्रंथांत आढळतात. भाषेच्या दृष्टीनें चटकदार असलेलें लिखाण ऐतिहासिक दृष्टीनें तितकें उपयोगी व खरें ठरेलच असें नाहीं व हें आजहि आढळतेंच.

असो; चौगुल्याबद्दल लिहितांना असेंच चुकीचें व विसंगत लिहिणें गांवगाड्यांत आलेलें आहे. पृ. १३–१४ वर कारू नारू म्हणजे बलुतेदार व अलुतेदार, ह्यासंबंधींचें विवेचन चालू असतां 'चौगुला हा बलुतेदार आहे व सामान्यतः तो तिसऱ्या किंवा दुसऱ्या ओळीचा म्हणजे थोरली, मधली व धाकटी ह्यांपैकीं तिसऱ्या म्ह० धाकट्या वा मधल्या रांगेचा बलुतेदार आहे; असें सुचविलें आहे आणि पुढें पृ. ५०–५१ वर गांवमुकादमानी ह्या प्रकरणांत 'गांवगाड्याचा हरकाम्या महार खरा; पण जातिभेदामुळें त्याला चावडी चढतां येत नसे. त्यामुळें शिवाशिवीच्या कामांत चौगुला हा पाटीलकुलकर्ण्यांचा तैनाती झाला. त्याचीं कामें चावडीची झाडलोट, गांवच्या दप्तराची ठेवरेव, दिवाणी, मुलकी, फौजदारी वगैरे कामासंबंधानें लोक चावडीवर बोला-

वणें आणि तेथें पाटील कुलकर्णी सांगतील तें खिजमतीचें काम करणें ' इत्यादि तपशील दिला आहे. नगर जिल्ह्यांतील अकोळ्याचा दाखला देऊन, गांवीं आलेल्या कोण्या मोठ्या माणसासाठीं स्वयंपाकाची भांडीकुंडी जमविणें व पुढें तीं उटणें म्ह० उजळणें म्हणजे घासणें हीं कामें चौगुल्याचीं होत, असें म्हटलें आहे.

इतिहासांतील तर नाहींच व चालू वस्तुस्थितीहि केवळ अशी नाहीं. बहुशः प्रत्येक गांवचावडींत एखादा देव असे व त्यामुळें महार चावडी चढत नसे. पण ज्या चावडींत असें नाहीं तेथील चावडींत, चावडी भरण्याच्या आधीं म्ह. गांवलोक, गांवसना, गांव-बैठक भरण्याच्या आधीं, निरगुडीच्या चार फांद्या घेऊन झाडण्याचें काम आजहि महार करतो. आणि चावडी म्ह. गावगोत जमून सभा भरल्यावर मात्र तो चावडीच्या बाहेर किंवा चावडीच्या निमपडवींतच उभा राहतो. जातीभेदामुळें पाटलानें चौगुला हा तैनातीस धरला असें मुळींच नाहीं.

आतां इतिहाससाधनाच्या आधारें काय आढळतें तें पाहूं. चौगुला हा अलुत्यांत नाहींच, पण बलुतेदारांतहि नाहीं; तो गांवकामगार व मुख्य वतनदारांतील एक आहे; आणि गांववसाहतीच्या वेळेपासूनचा पाटलाचा तो हस्तक आहे. चौगुल्यासंबंधीचे उल्लेख शक १२६० व शक १२७० पासूनचे आढळतात. मात्र हे उल्लेख बखरग्रंथांतील आहेत. आणि पत्रादिसाधन-ग्रंथांतील उल्लेख शक १४०० पासून आढळतात.

चौगुला हा शब्द निव्वळ मराठी, देशी दिसतो. हा फारसी शब्द नाहीं. संस्कृतहि नाहीं. राजव्यवहार कोशांत पुढील श्लोक आला आहे.

> चौगुला ग्रामणी प्रोक्तो ग्रामरक्षस्तु कोतवाल।
> कुलकर्णी ग्रामलेखी स्यात् पाटीलो ग्रामगोपकः॥ ३३२ ॥

ह्या श्लोकांत कोतवाल आणि पाटील ह्यांला ग्रामरक्षक व ग्रामगोपकः हे समानार्थीच शब्द सांगितले आहेत. पैकीं कोतवाल म्ह. ग्रामरक्षक हें बरोबर आहे. पण कोतवाल ह्या हुद्याचा अंमलदार खेडेगांवाला नाहीं. शब्द ह्या दृष्टीनें कोतवाल. ह्याला ग्रामरक्षक हा प्रतिशब्द दिला आहे तो बरोबर आहे. खेडेगांवासंबंधींचेच तेवढे शब्द ह्या श्लोकांत सांगितले असले पाहिजेत असें नाहीं. कोतवाल हा निराळा शब्द कोशकर्त्यांच्या ध्यानीं आला व तो त्यानें ह्या श्लोकांत सांगितला इतकेंच हें खरें, कीं, बाकीचे तीन शब्द खेडेगांवासंबंधीचे आहेत व त्या दृष्टीनें कोतवाल हा ही खेडेगांवाचाच वाटण्याचा संभव. ग्रामरक्षक ह्या दृष्टीनें ' जागल्या ' हा खेडेगांवाचा कोतवाल होईल. असो. मुख्य गोष्ट कीं, पाटीला

ह्याला जो ग्रामगोपकः शब्द सांगितला तो तितका योग्य नाहीं. उलट ग्रामणी व ग्रामगोपकः ह्यांत श्रेष्ठ कोण हें पाहिलें तर 'ग्रामणी' हाच ग्रामगोपक पेक्षां उच्चार्थाचा वाचक ठरेल. नुसतें गांवाचें रक्षण करणें हेंच काम करणारापेक्षां गांवचा पुढाईत गांवचा नेता जो, तो अधिक श्रेष्ठ, व त्याचा वाचक जो ग्रामणी शब्द तो चौगुला ह्या शब्दाचा प्रतिशब्द म्हणून दिला आहे हें लक्ष्यांत घेण्याजोगें आहे. आणि सांगण्यासारखी गोष्ट कीं, एक काल व एक प्रांत विभाग असा होताहि, कीं, तेव्हां तेथें चौगुला हाच पाटलापेक्षांहि सर्व श्रेष्ठ म्हणून असे. ती हकीकत पुढें देतच आहे. सध्यां केवळ शब्दार्थाच्या दृष्टीनें पाहावयाचें आहे. अमरकोशांत पाटील-वाचक शब्द नाहीं किंवा आहे तो ग्रामणी अथवा ग्रामाधिप हाच आहे. ग्रामणीचा तिसरा एक अर्थ तेथें दिला आहे (नापित) तो प्रस्तुत लक्ष्यांत घेण्याचें कारण नाहीं. चौगुला शब्दाला ग्रामणी हा जो प्रति शब्द रा. व्य. को. त दिला आहे तो बहुवचनयुक्त म्ह. ग्रामण्यः ह्या पदानें बृहदारण्यकोपनिषदांत चवथ्या अध्यायाच्या तृतीय ब्राह्मणाच्या परिसमाप्तींत दोन वेळ आला आहे. 'ब्रह्म व आत्मा ह्यावर राजाचें रूपक करून राजाची ये-जा होत असली म्हणजे, भाष्यकार आचार्य म्हणतात, हे ग्रामण्यः हे ग्रामनेतारः असे असे वागतात. असो. प्रस्तुत एवढेंच ध्यानांत घ्यावयाचें कीं, चौगुला हा एकवेळ पाटलाहून श्रेष्ठ होता व हें राजव्यवहारकोशाप्रमाणें आणि महिकावती बखरींतील पुढें दिलेल्या उल्लेखावरून दिसून येतें.

चौगुला शब्दाच्या दोन व्युत्पत्ती संभवतात. चौगुला, चवघला, चौघुला, असाहि हा शब्द वापरतांना आढळतो. ह्याचें पूर्वीचें रूप चौकुला असें असावें. आणि ह्या शब्दांतील चौ व कुल ह्या दोन पदांपैकीं क चा ग होऊन चौगुल, चौगुला असा शब्द झाला. कुल-शब्दाचा अर्थ 'हलद्वयेन यावती भूमिर्वाह्यते तत्कुलं इति वदंति' असा कुल्लूकभट्टांनीं म. स्मृ. तील 'दशी कुलं तु भुंजीत विंशी पंच कुलानि च। ग्रामं ग्रामशताध्यक्षः सहस्राधिपतिः पुरम्'। ह्या (अ. ७ श्लोक ११९) श्लोकाची टीका सांगतांना दिला आहे. ह्यावरून प्रथम सहा बैलीं दोन नांगरांनीं जी भूमि वाहिली म्हणजे कसली जात असे त्या पिकाऊ भूमीचा वाचक हा शब्द होता; पुढें तोच कुल-शब्द ती जमीन कसणाऱ्या व्यक्तीला लक्षणेनें योजण्यांत आला. आणि मग शेत कसणारीं अमक्या गांवांत इतकीं कुलें आहेत; कुळभरणा पाहिजे; कुळवार कमी आहे इत्यादि प्रयोग रूढ झाले. कुल-पट, कुलकर्णी ह्यांतील, कुल-पद ह्याच अर्थानें आलेलें आहे. इतिहासकालांत चौगुल्यासंबंधीचे जे उल्लेख कागदपत्रांतून येतात ते पाहिले तर, चौगुला हा पाटलाचा सहाय्यक आहे असें म्हणावें लागेल. म्हणजे येथें पाटील श्रेष्ठ, चौगुला कनिष्ठ असें झालें. गांव वसाहत करतांना म्हणजे गांव-शिवार लागवडीस आणतांना ज्या ह्या सहाय्यकानें वर म्हटल्याप्रमाणें चार कुलें म्हणजे

म्हणजे नितकी भूमि नांगरून वहितीला आणिली, तो चौकुल, चौगुला झाला; अथवा मूळची जी थोडी जमीन होती तीनच इतर पड जमीन वहिनाला आणून भर घालून ती ज्यानें चौगुणित केली तो चौगुला होय. पहिल्या व्युत्पत्तींत क–चा ग झाला आणि दुसऱ्या व्युत्पत्तींत इ त – चा लोप होऊन ण – चा ल झाला आहे. हे दोन्ही वर्णबदल व्याकरणमान्य आहेत. असो; अशा प्रकारें चौगुला संज्ञेची व्युत्पत्ति संभाव्य वाटते. कालदृष्ट्या आधींचा म्हणून चौगुल्याचा निर्देश जेथें आला आहे, म्हणजे महिकावती बखरींत, तेथें चवघला असें त्याचें रूप आलें आहे व त्याच्याच सारखा दुसरा अधिकारी 'देसला' म्हणून तेथें दिला आहे. ही बखर बाळबोधींत लिहिलेली आहे. मोडींत नाहीं. म्हणजे क – चा ला वाचण्याचा संभव नाहीं. 'देसक' असाहि शब्द कागदपत्रांतून येतो. पण येथें देसला असाच शब्द आहे. पहिला देसला नंतर चवघला असा क्रम बखरींत आला आहे. ला हें शेवटचें अक्षर दोहोंत एकसारखें आलें आहे तरी पहिल्यांतील ला हा प्रत्यय होऊं शकेल, दुसऱ्याची संभाव्य व्युत्पत्ती वर सुचविलीच आहे.

चौगुला हा शब्द ऐ. कागदपत्रांतून क्वचित चौ ह्या संक्षेपानें येतो. व हेंच संक्षिप्तरूप चौधरी ह्याहि शब्दाचें आहे. तेव्हां सामान्यतः पाटील ह्या शब्दाशीं जोडून जेव्हां हा संक्षेप लिहिलेला असेल तेव्हां त्याचें वाचन चौगुला असें करावयाचें आणि शेटे महाजन किंवा पेठ बाजार ह्यांशीं संबंध म्हणून हा संक्षेप आलेला असेल तेथें तो चौधरी ह्या शब्दाचा दर्शक आहे असें समजावयाचें. देशावर–खानदेश, उत्तर हिंदुस्थान ह्या बाजूस–चौधरी, कानूनगो हे अधिकारी फार मोठे आहेत. त्यांतील चौधरी हे इकडल्याहून वेगळे आहेत.

चौगुला हा पाटलाप्रमाणें हुद्दा, अधिकार सांगणारा शब्द आहे. तो बव्हंशानें महाराष्ट्रांत मराठा ज्ञातींतील आहे. तरीहि पाटलाप्रमाणेंच इतर ज्ञातींतीलहि घराणीं चौगुले असल्याचें आढळतें. शिवरे गांवीं शिंपी चौगुले आहेत; दाभोळ हर्णैकडे ब्राह्मण चौगुले आहेत. मावळांत एका गांवीं केळकर घराणें चौगुलकी करणारें असल्याचें आमच्या संशोधक मित्रांनीं सांगितलें. कोकणांत अविंध म्ह. मुसलमानहि ह्या हक्काचा अंमल सांगणारे आहेत. माळीहि चौगुले आहेत. असे असले तरी, चौगुला हा महाराष्ट्रांत मुख्यतः मराठा आहे.

'जथे चौगुले' असेंहि लिहिलेलें आढळतें सं. २० ले. ३०. सुपें येथील, पाटिलकींतील वडीलकी कोणाची ह्याबद्दल तंटा लागला. तेव्हां ज्यांच्या ज्यांच्या सडीसाक्षी म्हणजे जुने दाखलेपुरावे व संमती मागविल्या त्यांचा उल्लेख, समस्त भाऊ, जथे माळी, जथे गोलाड, जथे चौगुले असा केला आहे. जथे चौगुले म्ह० निरनिराळ्या गांवांतील मिळून अनेक चौगुले मंडळी.

चौगुला ह्या शब्दाचा वर म्हटल्याप्रमाणें जुना उल्लेख महिकावतींत येतो व तेथें तो अमरकोशकारांच्या सांगण्याप्रमाणें किंवा रा. व्य. कोशांत आल्याप्रमाणें ग्रामाधिप, ग्रामश्रेष्ठ ह्या दर्जानें येतो. उत्तर कोंकणच्या बाजूचा माहीम, मरोल, ठाणें इ. हा भाग प्रतापबिंबानें जेव्हां शिलाहारांपासून घेतला व त्याची पुनर्वसाहत केली, तेव्हां म्ह. सुमारें श. ११६३ मध्यें, मरोळ येथें, रखमाजीराव सोमवंशी देसला; आणि मालाड येथें गंगाधरराव देसला असे अधिकारी योजिले. त्याच वेळीं शेषवंशी यांस चौगुलेपद दिलें. प्रतापबिंबानंतर महीदेव, त्या नंतर केशवदेव हा सत्ताधीश झाला; आणि तेव्हांचा वृत्तांत अधिक दिला आहे. त्या वृत्तांतांत, मरोळकर देसला यास ९०० फद्यांची वृत्ति नंतर चौगुल्यास ५०० फद्यांची वृत्ति आणि म्हातरे, साहाणे त्यांसहि ४०० व ३०० फद्यांची वृत्ति दिली, असा तपशील दिला आहे. असाच तपशील मालाड स्थापण्याचाहि दिला आहे व तेथेंहि १००० फद्या देसल्यास, तर लगेच चौगुल्यास ६०० फद्या* दिल्या, असें म्हटलें आहे. त्यानंतर कांहीं वर्षांनीं कोंकणांत सर्वत्र तुर्काण प्रवर्तमान झालें. त्यांशीं नागरशा हा लढून कांहीं प्रांत सोडवूं लागला. ह्या सर्व धालमेलींत ज्यांना हाताशीं घेतले, त्यांचा गौरव केला.व देश स्थीरस्थावर राखला. त्यासंबंधानें ह्या बखरींत बरीच विस्तृत हकीकत तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत दिली आहे. ही सर्व हकीकत शक १४६० पर्यंतची आहे. त्यांत जीं 'नाग्राणिक' अशीं कुळें दिलीं आहेत. त्यांत प्रथमच म्हटलें आहे (पृ. ३४) कीं, 'देशा आलिया कुळांस वृत्ति दीधल्या' सूर्यवंशी राज्यधामी नाहिरी स्थापिले। शेषवंशी सिंदे कुळें ९ नव, त्यासी चवघले मुख्य करोन दिधले॥, ह्यापुढें चवघले ४; व त्यांचीं धारपूरकर बाळकोजी पहिला, दुसरा विठोजी गव्हाणकर, तिसरा थेवखंडकर व चवथा पाचघऱ्या, अशीं नांवें दिलीं आहेत. येथें बखरलेखकासंबंधानें सांगावयाची गोष्ट अशी कीं, लेखकास क्रमानें म्हटलें म्हणजे आधीं देसले म्हणजे देशमूख कोण तें सांगावयाचें होतें. पण लिहिण्याच्या भरांत न कळत चवघले किंवा चौघले हे आधीं लिहिले गेले व हें लक्षांत येताच चवघल्यानंतर देसल्यांचा मोघम उल्लेख लगेच केला व तेथें म्हटलें 'याउपरांत यशवंतराव सोमवंशी रखमाजीराव देसले २७ कुळींचे, व या खालते चौघले' असें सांगून नवांपैकीं राहिलेले चौगुले पुनः सांगितलें. ह्या हकीकतींत पाटेलांचा मुळींच निर्देश नाहीं असें नाहीं. पण तो चवघल्यानंतर आहे. देसाये किंवा देसले, नंतर चवघले, नंतर चौधरी नंतर म्हातरे नंतर साहाणे नंतर पाटील, हवालदार इ. म्हणजे चवघलेनंतर चौथे पाटील सांगितले आहेत. व 'येणेप्रमाणें वृत्ति दिधल्या, सिरपाव जाले, बैसकार सर्वांसी दिधला, देसायांसी मुलुख विचारला' इ. इ. वृत्त तेथें आलें आहे.

---

* फद्या = दोन पैसे.

ह्यावरून उत्तरकोंकणांत श. ११११० ते १४०० पर्यंत देसायांच्या खालोखाल चौगुले असत. येथेंच एके ठिकाणीं म्हटलें आहे 'एकेका देसल्याकडे ४ चवघले.' म्हणजे देशमुखानंतर चौगुल्याचा मान आहे. दुसरी एक गोष्ट येथें दिसून येते ती ही कीं, चौगुल्याप्रमाणें पाटील हेहि शेपवर्षींच सांगितले आहेत व त्यांस चवघल्या-इतकीच ६०० अथवा ५०० फद्यांची वृत्ति मिळाली आहे. तात्पर्य, प्रथम चौगुले हे पाटलापेक्षां श्रेष्ठ, पण पुढें पाटील व चौगुले, बखरींत समसमान म्हणून सांगितले आहेत.

आतां प्रत्यक्ष कागदपत्रांत चौगुल्यासंबंधींचे जे उल्लेख आढळतात त्यांतील कांहीं लक्ष्यांत घेऊं. चौगुल्यांत चौगुला म्हणजे गांवचौगुला, देशचौगुला व जानचौगुला असे तीन प्रकार सांगितले आहेत. पैकीं गांवचौगुल्याचे, म्हणजे नुसते चौगुला ह्याच हुद्यानें सांगितलेले उल्लेख फार आहेत. देशचौगुल्याचे उल्लेख त्या मानानें कमी आहेत. कालदृष्ट्या पाहिलें असतां मिळालेल्या उल्लेखांत देशचौगुल्याचाच उल्लेख आधींचा सांपडतो शि. च. सा. ले. १ हा शक १४१४ मधील महजर आहे, परगणे खटावमधील अथर्ववेदी देशकुळकर्णी गांवकुळकर्णी ह्यांमध्यें कलह लागला असतां त्याच्या निर्णयार्थ २१ गांवची देसक-मंडळी बोलाविली होती ह्यांत काजी, पेसवे, मुजुमदार, कानोजी राजे इ. राजनागरिक मंडळी असून देसकांत देसाईण तुकाई म्हणून आहे व त्यानंतर लखमनाक देसचौगुला हा आहे. व त्यानंतर मोकदम व चलुने बसले आहेत. ह्या ठिकाणीं मोकदम म्हणजे पाटील ह्यांच्या वरचा मान चौगुल्याचा असला तरी हा चौगुला देश-चौगुला आहे हें लक्ष्यांत घेतलें पाहिजे. ह्यावरून नुसत्या चौगुल्याचें स्थान गांवकींत कोणतें तें ध्यानीं यावयाचें नाहीं. कऱ्हाडचे खालोखाल डुबल हे देशचौगुले आहेत ( संशोधक-धुळें, ऐ. ले. चर्चा भा. २ पृ. २०-२१ ).

वर महिकावतींच्या बखरींतील चौगुल्याविषयींच्या उल्लेखांबद्दल सांगितलें त्यांत देसल्याच्या खालोखाल जो चौगुल्याचा उल्लेख आला आहे तो नुसता चवघले असा आहे. देश-चौगुला नाहीं. तो तसा मानणेंहि इष्ट नाहीं. जर मानले तर त्यापुढील पाटील, म्हातरे, हवालदार ह्यांचेहि उल्लेख सुटेच आले आहेत तेहि तसे मानावे लागतील व तें तर शक्य नाहीं.

बखरींत जसे देसले नंतर चवघले सांगितले; तसे पत्रादि कागदांत सांगितलें नाहीं. पत्रांतून देसचौगुला असेल तर वरील उल्लेखाप्रमाणें गावपाटला आधीं त्याची नोंद येईल; पण एरव्हीं मोकदमानंतर म्हणजे पाटलानंतरच चौगुलेव्यक्तींचे निर्देश सर्वभर आलेले आहेत.

लोकसभेंतील व राजदरबारचे गांवकामदार सांगतांना चौगुल्याच्या उल्लेखाचा क्रम मोकद्दम, चौगुले, बलुतेदार असा[1] सामान्यतः येतो. त्यांतच शेटेमहाजन त्यांचा निर्देश करणें झाला तर तो चौगुल्यानंतर करण्यांत येतो.[2] कान्होजी आंगरे यांनें चाकणची देशमुखी व पाटिलकीहि विकत घेतली. त्याच चाकण परगण्यांतील पिंपरी बुद्रुक ह्या गांवचीहि पाटिलकी कान्होजीनें श. १६४८ (इ. १७२६) मध्यें खरेदी केली. त्या खरेदीपत्रावर त्या वेळीं गांवच्या पाटलांच्या फक्त सह्यासाक्षी झाल्या. पण गांवगनाचे पाटील आणि खुद्द त्या गांवचे चौगुले व बलुतेदार त्यांच्या साक्षी तेव्हां झाल्या नाहींत. त्याकरतां तेंच खरेदीखत पुनः लिहून त्यावर राहिले त्यांच्या संमतीदर्शक साक्षी घेतल्या. त्यांत त्याच म्ह० पिंपरी गांवच्याच चौगुल्यांच्या साक्षीपासून प्रारंभ केला आहे. तेथें त्या गांवच्या पाटलाचा निर्देश नाहीं. तात्पर्य, चौगुल्याच्या साक्षीची अशी अवश्यकता असल्याचें दिसून येतें व त्याच्या उल्लेखाचा क्रम गांवकामदारांत पाटलानंतर लगेच आहे.

एकदां चौगुल्याचा निर्देश बलुतेदारानंतर केला गेला. पण त्याच पत्रांत पुढें बलुतेदारापूर्वी तो शब्द लिहून त्याचें योग्य स्थान तेथेंच दर्शित केलें आहे. देशचौगुल्याचा उल्लेख मात्र गांवपाटलाच्या आधीं येतो व तें सरळच आहे. शिवसा २. ले. २०३.

असेंच एकदां छत्रपति शाहू महाराजांनीं मसूरची देशमुखी जगदळ्याची असतांना स्वतःकडे ठेवण्याचा मानस धरला होता. पण ती, सेनापति धनाजी जाधवरावांच्या आग्रहामुळें यादवांना दिली तथापि असें करणेंहि केवळ जोरावरीचें; ह्यांत पंचगत म्ह. पंचाईत म्ह. न्याय नाहीं; हें जाणून सर्व गोतांनीं मिळून जगदळ्यांची देशमुखी असल्याचा महजर करून दिला. त्या महजरावर फक्त देशमुख, देशकुलकर्णी, गांवोगांवचे पाटील-कुलकर्णी ह्यांच्यांच नोंदी व साक्षी आहेत. ह्यांत बलुतेदार मुळीच नाहीत. अशांत दोन चौगुल्यांची साक्ष निशाणी नांगर करून आली आहे.*

खं. १५ ले. १३ हें पाटिलकीचें क्रयपत्र आहे. त्या पत्रावर चौगुल्यांचीं दोन नांवें दिलीं असून त्यांची निशाणी नांगर न सांगता काटी सांगितली आहे. काठी ही निशाणी दोघांची संभवते. एक जमीन मोजण्याची काठी व दुसरी महाराची. पैकीं शेतजमीन मोजणीची काठी ही येथें लक्षांत घ्यावयाची आहे. म्ह. चौगुल्याचें हें एक काम आहे.

---

१ सनदापत्रें पृ. १७ ले. १२, ४९; शि. च. सा. १ ले. ४१, ४९; शक १८३४ इ. वृ. पृ. ५६; शि. च. सा. २ ले. २२५; खं. १५ ले. ३३, ४८; पुरं. द. १ ले. ७६; चंद्र. १ ले. ४ इ. इ. २ पे. द. ३१ ले. ५१, ९२; खं. १३ ले. १०३ मध्यें साकेगावच्यां 'अडाण व बलुतेदार' यांची यादी आली आहे त्यांत चौगुला नाहीं. * खंड. १५. ले ५९.

एकदां तर असें झालें कीं, पुणें परगण्यांतील कपिटे ह्या गांवाचा जानोजी येवगे त्याजकडे चौगुलकीही होती आणि पाटिलकीही होती. पण ह्या दोन्ही वतनांचीं 'कामें करणें त्याच्या बापास = कनकोजीस – अंमळ जड जाऊं लागलें असावें, व म्हणून कनकोजीनें आपल्या मोकदमीच्या कामाकरतां रामोजी क्षिपारेकर हा 'जेवणाईत करून' म्हणजे पदरीं सहाय्यक म्हणून ठेवला. पुढें ह्या रामोजीस पाटिलकीचा लोभ उत्पन्न झाला व त्यानें तें वतन आपलेंच व्हावें ह्याताडीं 'कनकोजीस मारा करून ठार केलें.' आणि पाटीलकीकरतां ह्या येवगे घराण्यानें पुनः नांवहि घेऊं नये म्हणून सर्व प्रकारें त्याची दुर्दशा केली; त्याचीं गुरेंढोरें घेनलीं, त्याची वस्तभाव लुटली असा छळ आरंभिला. त्यावेळीं जानोजी तर लहान मूल. पुढें जानोजी जेव्हां मोठा झाला व आपली पाटीलकी हस्तगत करण्याचा यत्न करूं लागला. तेव्हां आपल्यास ह्या कामीं कोणी पाठीरासे ऐसा असावा; म्हणून त्यानें भोसले घराण्यांतील दत्तोजी विठोजीस आपलें निमें चौगुलकीचें वतन हक्कमान-पानासह करार करून दिलें. त्या करारपत्रांत भोसल्याला जानोजीनें असें लिहून दिलें कीं, गोतांत वाद सांगोन मला माझी मोकदमी हातास आली म्हणजे ती तुला (भोसल्यास) द्यावी आणि मग मी आपली चौगुलकी समुद्री सावी. म्हणजे येथें पाटिलकी पेक्षां चौगुलकी श्रेष्ठ असें व्यवहारदृष्ट्या ठरतें. नाहींतर दोन्ही वतनें एकाकडे असतांना गुमास्त्याकरवीं पाटिलकीचें काम व स्वतः चौगुलेपण चालवावयाचें व शेवटीं देऊन टाकतांनाहि चौगुलपण स्वतःकडे ठेऊन पाटिलकी द्यावयाची; असें केलें नसतें. सं. १५ ले. ३८१

वाल्ह्याचा सोन ठाकूर हा मोठा तोलाचा व पथकदार सरदार व पुढें जहागिरदार झाला. पण तो आपल्या चौगुलकीविषयीं आपुलकी दाखवीत असतांना वाल्हे वसविल्या पासूनचा संबंध दर्शित करीत आहे. पुं. भा. ३ ले. १९३.

श. १६६० च्या आषाढ वद्य ५ ला पुणें गांवाची शांत केली. ह्या गांवशांतीच्या पद्धतींत एक नियम असा कीं, गांवाच्या बलुतेदार मांगानें डोक्यावर पेढियाची घागर घेऊन गांवाभोंवतीं टोणग्यासह फेरा घालावयाचा. ह्यावेळीं महार म्हणाले कीं ही घागर आम्ही फिरवणार. त्या वेळीं चिमाजी आपाच्या कानावर हें भांडण घालून पुढें जमीनदार व गांवकरी यांनीं तें मिटविलें व मांगाचाच हक्क खरा असा निर्णय झाला. त्या निर्णयपत्रावर पाटलांच्या सह्यांत चौगुल्याचा निर्देश आहे. पे. द. २२ ले. ३७९.

चौगुले व्यक्तींचीं नांवें पाहिलीं असतां चौगुला व चौधरी कांहीं ठिकाणीं एकच होत, असें त्या नांवांवरून म्हणतां येईल. कृष्णशेटी बिन रामशेटी गुठाळा चौगुला, नड्कर्णी बिन सेट्याजी कारिरे चौगुला, निकाजी बिन एलाजी जकाते चौगुला, हीं नांवें व्यापाऱ्यांतील व पेठकरी मंडळींतील वाटतात. पहिलें नांव निंब (प्र. वाई) येथील सदानंद मठाकडे अर्धा चाहूर जमिनीचा फाळा व इतर हक्क दिले त्या वृत्तिपत्रांत आलें असून, त्या मठाला जे इतर हक्क दिले आहेत त्यांत आयातनिर्यात म्हणजे बाजारपेठेंतील येणाऱ्या जाणाऱ्या मालावरील कर दिला आहे. अर्थात् पाटलामध्यें हा कृष्णशेटी रामशेटीचें नांव चौगुले आडनांव लावून आलें. तरी तें शेतीकडील अधिकारी म्हणून आलें असें म्हणण्यापेक्षां व्यापारी अधिकारी म्हणून आलें असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. दुसरेंहि नांव कोल्हापूरचे आनोगन्ये कोग म्हणून चालतेल्या मंडपाच्या निर्णयपत्रांतीं जी ब्रह्मसभा व महाजनसभा झाली त्यांतील मंडळींपैकीं म्हणून आलें आहे. अर्थात् तेंहि शेटेमहाजनांबरोबर म्हणजे पेठकरी अधिकारी म्हणून आहे. पण एक नांव असें गमतीचें आलें आहे कीं, चौगुला व चौधरी हे दोन्हीं एकच, एवढेंच नव्हे तर पाटीलहि तोच समजावा म्हणजे हे तिन्ही एकच होत, हें सांगणारें तें नांव आहे. चाकणचे कुबेश्वर भट वहाळे उपाध्ये यांना, दर गांवास टका शाही एक व धान्य मण एक, असें इनाम, त्यांनीं अनुष्ठान केलें व पाऊस पडला म्हणून दिलें आहे. हें इनामपत्र सर्व चाकण परगण्याच्या देशमुख देशपांडे पाटील इत्यादि लोकाधिकारी मंडळींनीं दिलें पाहिजे व तसें तें आहे. त्यांत पिंपळगांवचे 'मोकदम' या शीर्षकाखालीं 'संकुराजी वा रामाजी चौधरी' असें नांव दिलें आहे. म्हणजे वरिष्ठ व्यक्तीचें नांव सांगतांना त्याला 'पाटील' म्हणून म्हटलें आणि तें नांव पूर्ण करण्याकरितां त्याच्या बापाच्या नांवाचा निर्देश केला तो 'चौधरी' म्हणून केला व हा चौधरी पुत्र पाटील, मोकदम या मथळ्याखालीं नमूद केला. म्हणजे येथें पाटील हाच मोकदम व चौधरीहि आहे असें म्हणतां येईल. वस्तुतः चौगुला, चौधरी व पाटील हे गांवकामगार तिन्ही वेगवेगळे आहेत. व त्यांतील चौधरी हा पेठेशीं संबद्ध आहे. गांव जर लहान असेल तर पाटीलच चौगुला, चौधरी व सर्वहि असेल. शिकापूर येथें नवी पेठ वसविण्याच्या महजरांत अवजी बिन रूमाजी सातवडा चौगुला व शेटी, असें नांव आलें आहे. येथें शेटीच्याचें—माप, वजनें तगारण्याचें—काम चौगुल्याकडेच असल्याचें दिसतें. पहा पे. द. ३१ ले. १७८. पण बाजार पेठ जर मोठी असेल, म्हणजे बाजार नियमित व मोठा म्हणून ओळखल्याचा चांगला

भरत असेल तर चौधरी, मोकीम, शेटे महाजन, अवदी, दालवार, विडवई, जोशी इत्यादि पेठेचे अधिकारी स्वतंत्र असणें अवश्य व महत्व आहे. पण अशी स्वतंत्र पेठ जेथें नाहीं तेथें पाटीलच चौगुला, चौधरी व अवदी असणें संभवनीय आहे. तसें शिक्रापूरचें असेल.

चौगुला हा मुख्यतः पाटलाप्रमाणें गांव लावणी करणें, सारा-वसुली करणें व ती वसुली दिवाणांत भरणा करणें असा शेतशिवाराकडील वतनी गांवअधिकारी आहे. त्याला दुसरा पुरावा हा कीं तो 'प्रज' म्हणजे शेत कसणारा आहे, शेतांत प्रत्यक्ष काम करणारें कुल आहे. सुपे देशपांडे यांचे कागदांत (श. १५५८ इ. १६३६) आंबी खुर्द येथील रुद्रभट बिन रघुनाथभट चावरे ह्यांच्या एक चाहूर जमिनीचा कर्दा म्हणजे प्रज असर पाटील चौगुला हा आहे. शिरवळच्या देशकुलकर्ण्यांची जमीन गोमाजी ढमाल चौगुले हा कीर्दी करीत असे (शि. च. सा. १ ले. ६ व ले. ११). एकदां झुंझारराव मरळदेशमूख यांचे देशमुखीबद्दल भांडण सुरू झालें व त्या भांडणापाई पुरंधरगडावर निर्णयासाठीं माहितगार अशी निवडक सहा मंडळी पाठवावी असें ठरलें. त्यांत ४ मोकदम, १ चौगुला, १ तुरसंदाज हीं मंडळी नियोजित केली आहेत (मरळ द्रोस पृ. ११. व शि. च. सा. ७). तरगणे शिराळ्याचे निकम देशमूख, छत्र. संभाजीराजे यांचे राजवटींत मुलूख जेव्हां वैराण जाला, व भूमी यवनाक्रांत झाली तेव्हां मोगलाईत गेले. पुढें पेशवाई सुरू होतांच म्ह. इ. १७१६ मध्यें त्या देशमुखाचा मूल गांवीं आला. पण इनामाचा 'पेंहोळा' त्यास ठावका नव्हता. इतर कोणी एक पटी इनामाची दाखविली. पण चलुने यांजबरोबर चौगुल्यास बोलावून विचारिले. त्यांनीं इनामाच्या दोन पट्या दाखविल्या. अर्थात् त्या दिल्या व दिल्याबद्दल जो राजीनामा म्ह. संमतिपत्र दिलें तें फक्त चवगुल्यानींच दिलें आहे व इनाम चालवूं असेंहि त्यांत म्हटलें आहे (सं. सा. ५ ले. ३७). शि. च. सा. सं १ ले. २१ मध्ये पटवर्धन जोशी व म्हसवडे जोशी ह्यांमध्यें भांडण होऊन शेवटीं रवादिव्य झालें. त्यांत रवा काढणाऱ्याचा हात भाजला कीं नाहीं, व दिव्यीं कोण उतरला हें पाहून सांगवयाचें काम चौगुल्यानें केलें आहे.

चौगुल्याचा मान गावकींत कोठे व कसा होता हें आणखी कळून येण्यासाठीं चौगुल्याची निशाणी कोणती, त्याचे उल्लेख कोठे येतात ह्या माहितीप्रमाणें सरकारदरबारीं त्याची भलावण कशी होते व केव्हां आवश्यकता

असतें, हीहि माहिती घेतली पाहिजे. गांवच्या जमाबंदीची खंडणी जेव्हां ठरतें तेव्हां पाटलाबरोबर चौगुला व कुलकर्णी गेला आहे व त्यांत चौगुले व पाटील दोघे व कुलकर्णी एक जण आहे. अशा वेळीं ह्या सर्वांना खंडणीचीं वस्त्रें मिळत असत रा. सं. ६ पृ. ४५. पुण्याचे झांबरे पाटील दोघे, राजर्षी कुलकर्णी व शेळका व चिंचवा हे दोघे चौगुले दिवाणांत गेले असून त्यांस वस्त्रें मिळालीं आहेत. अशाच एका प्रसंगानें चौगुल्याचा शिरपाव वरवंडकर पाटलानें चौगुल्याकरतां म्हणून आणला पण त्याला न देतां आपल्याच घरीं ठेवला. तेव्हां त्या पाटलास गुन्हेगारी १२०० रु. द्यावी लागली आहे. सोनवडकर पवार पाटलास अशीच गुन्हेगारी पडली आहे. चौगुल्याचें उत्पन्न व काम हें प्रसंगीं इतकें असे कीं, त्याच्या पदरीं त्याला गुमास्ता ठेवावा लागे. पण असा चौगला क्वचित असे. सं. ६ पृ. ५४ वर खंडो रघुनाथ हा चौगुल्याचा गुमास्ता म्हणून उल्लिखित आहे. पाटलाप्रमाणें चौगुल्याचा स्वतंत्र शिराळ शेट निघे सं. ६ पृ. ९२-९३. दौंडचे चवगुले जठार असून त्यांच्यांत कांहीं भांडण होऊन ती फिर्याद पेशव्यांकडे आली. पेशव्यांनीं निर्णयप्रसंगीं दोन चौगुले केले व त्या उभयतांस गांवखंडणीचीं वस्त्रें दिलीं, असें तेथेंच म्ह. सं. ६ पृ. ३३ वर आलें आहे. ह्यावरून चौगुल्याच्या गांवकींतील मानमान्यतेविषयीं व कामाविषयीं कांहीं कल्पना येईल. रा. सं. २० ले. ७ मध्यें पाटील व चौगुला एकच व्यक्ति असल्याचें आलें आहे. ह्या उल्लेखाचा शक १५५८ म्ह. १६३६ हा आहे. महजर प्रसंगीं चौगुल्याचे उल्लेख येतात ते मोकदमाच्या नांवाला लागूनच येतात. कांहीं कांहीं महजरांत तर पाटील व चौगुला ह्या दोन व्यक्तींचा एकत्र उल्लेख करून नांगर ही निशाणी केली आहे. पे. द. भा. ३१ ले. १७ पहा. पारनेर येथील नाईकवाडी-बद्दलचा हा महजर आहे. ह्यावर ८०-८५ नांवें आलीं त्यांत खेऊजी पा। व नरस पा। मोकदम मौ टाकली बाजी व काउजी चौगुला असें एका ओळींत लिहून पुढें नांगर चिन्ह दर्शविलें आहे. वतनपत्रें निवाडपत्रें ह्यामध्यें पृ. ६६ वर पंढपूरकर वडवे बेणारे त्यांचें भांडण व त्याचा निर्णय आला आहे. त्यांत आणि खंड २० ले. ४४ वरील सुपे-महजरावर ४, ५ चौगुल्यांचीं नांवें आलीं आहेत व त्यापुढें नांगर काढला आहे. कांहीं महजरांत राजमुद्रा, देसक, बलुते, सेटेमहाजनानीं अशीं शीर्षकें देऊन त्याखालीं तशी नांवें दिलेलीं असतात. त्या नांवांत म्हणजे शीर्षकाच्या नांवांत पाटील व चवघुले असेंच तेवढें स्वतंत्र वेगळें शीर्षक, आणि नंतर बलुते असें शीर्षक दिलेलें असतें. कांहीं महजरांत नुसते चवघले कोण कोण ते सांगण्या-

साठीं 'चौगुले' एवढेंच मधोमध लिहून त्याखालीं नुसतीं चौगुल्याचीं नांवें दिलेलीं असतात म्हणजे पाटलाप्रमाणें व बरोबर ह्या चौगुल्याला मान आहे, हें दिसून येतें. बलुतेदारांपैकीं किंवा नाइकवडी इत्यादी वेगवेगळ्या मंडळींना त्यांच्या वेगवेगळ्या निशाण्या आहेत, तशांपैकीं चौगुला हा बलुतेदार नाहीं म्हणून तसली कांहीं निशाणी चौगुल्यास नाहीं व पाटलाप्रमाणें नांगर ही निशाणी चौगुल्याची आहे.

गांवासाठीं म्हणून कांहीं लिहून द्यावयाचें असेल तर तें पाटील व चौगुला ह्या दोघा व्यक्तींनीं लिहून दिलें आहे. श. १६०९ मध्यें परगणें असेर येथील फौजदाराला पुढीलप्रमाणें पत्र लिहून दिलें आहे. आमचीं गुरें ढोरें जंगलांत चरूं द्यावीं. त्या बा। रु. २५ आम्ही देऊं, ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड ५ ले. २८. देसकुलकर्णी तिमाजी रुद्र हा आपले कामावर रुजू झाला. कामावर रूजू झाल्यामुळें त्याचा मुशाहिरा त्यास मिळावा, त्याची जमीन व राहण्याची जागा तसेंच त्याचें दप्तर त्यास मिळावें, अशाबद्दल त्यानें देशमुखांना एक अर्दास लिहून पाठविली आहे. त्या अर्दासेवर, साहेबाचीं चाकरी जैसी काही आपल्या वडिलीं केलीं तेच रवेसीनें करण्यास रुजू जालों, असें लिहून आपल्या रहात्या म्ह. जागोली ह्या गांवच्या मोकदम व हेजीब ह्यांचेप्रमाणें मनोजी चौगुला ह्याचीहि संमतीची सही आहे.

चौगुल्याचें उत्पन्न किती ह्याबद्दल मीं पाहिलें त्या ग्रंथांतून कांहीं सांगतां येण्याजोगें आढळलें नाहीं. पण वेळोवेळीं ज्या पट्या आकारल्या जात त्यांत चौगुल्याच्या नांवावर इतरांच्या मानानें कितवा हिस्सा आकारला जाई, हें एकदोन प्रकारच्या जाबिता-सीस्त यादीवरून कळून येतें आणि मग त्यावरून उत्पन्नाची कांहीं कल्पना करतां येईल. शिवाजीराजे ज्या वर्षीं राज्यासनीं आरूढ झालें त्या वर्षीं आपल्या मुलखांतील रयतेवर त्यांनीं मिरासीपट्टी म्हणून आकारली होती. त्यांत शिरवळ परगण्यांवर एक सहस्र होन आकारले होते. त्यांत देशमुख देशकुलकर्णी यांजवर ५०० होन (देशमुख ३६६ व देशकर्णी १३४), पाटील मंडळी २५० (गांवें ३९), गांवकुलकर्णी २००, सेटे महाजन यांजवर ३४ होन आणि चौगुल्याकडून अवघे १४ होन घेतले आहेत. (शि. च. सा. १ ले. ५५), म्हणजे कुलकर्ण्याला ५ होन तर चौगुल्याला ॥। होन पडतो. असाच एक कानुजाबता पे. द. ३१ ले. १०४ मध्यें इ. स. १७०८ मधील प्रसिद्ध झाला आहे. त्यांत सरदेशमुख, साहोत्रा,

देशमूख, देशपांडे, नाडगौडा व देशचौगुला व माहाल मजकूर ही सात सदरे देऊन तपशील सांगितला आहे. तेथें देशमुखाला ५ होन व देशपांडे यास २॥ होन, नाडगौडाला व देशचौगुल्याला १। होन आकार धरला आहे. हा आकार ' धारा कदीम करार इनामदार बाजे ' म्हणून दिलेला आहे. एकदां ९० बिघे जमीन पाटीलकुलकर्णी सोडून इतर वतनदार व बलुतेदार यांमध्यें त्यांच्या त्यांच्या दर्जाप्रमाणें विभागून द्यावयाची होती. त्यांत सर्वांत ज्यास्त वाटणी ८१५ बिघ्यांची होती व असे तीन वाटे चौगुला, सुतार आणि महार या तिघांना दिले आहेत. नंतर सोत ८१० बिघे, न्हावी ८७, सेटे चौधरी परीट नि तराळ यांस प्रत्येकीं ८५ बिघे; चांभार व ठाकूर यांस ८३८३ व कुंभार ८२; एकूण पाऊण चाहूर जमिनीची ही विभागणी केली आहे ( खं. १५ ले ४४). ह्यांत सर्वांत मोठा वाटा चौगुल्यास आहे. व सोतापेक्ष ८५ बिघे जमीन चौगुल्यास अधिक दिली आहे. त्यावरून चौगुल्याचा दर्जा व स्थान लक्ष्यांत येण्यास मदत होईल.

गांवांतील धान्याचीं पेवें वगैरे चोरीस गेलीं तर त्या चोरीचा ठिकाण लावून देणें हें काम प्रसंगीं चौगुल्यावर पडे. खं. १५ ले. २४१ मध्यें चौगुला म्हणतो ' आपण चोर लावून देतो.'

चौगुल्यासंबंधी आणखी एक प्रकार असा आढळतो कीं त्यावरून चौगुला म्हणजे त्या त्या जातींतील प्रमुख व्यक्ति. धनगर ज्ञातींत म्हसके, मेंढके, व खुटे धनगर म्ह म्हशी व मेंढ्या पाळणारे आणि घोंगड्या विणणारे, असे तीन पोटप्रकार आहेत त्यांपैकीं म्हसके धनगरावर म्हैसवण म्हणून जो कर आकारावयाचा, त्यांत त्या धनगरां तील गावडा व चौगुला ह्यांच्या पालक व ज्या बादीच्या म्हसी म्ह. जरठ, वांझ म्हशी त्या सोडून द्या, असें सांगितलें आहे. (शा. १८३५ इ. वृ. पृ. ३३२). असाच कोळी चौगुल्याचा उल्लेख ऐ. सं. सा. खं. ५ ले. ६४ मध्यें आला आहे. ह्या चौगुल्यांनाच जातचौगला असें म्हणावयाचें.

चौगुल्याच्या कामासंबंधानें, व गांवांतील त्याच्या स्थानासंबंधानें संतवाङ्मय व धनगरी गाणीं ह्यांमधूनहि उल्लेख आले आहेत व ते लक्ष्यांत घेण्याजोगे आहेत. महिपती आपल्या भक्तविजय ग्रंथांत माणकोजी बोधला ह्या संताचें चरित्रगान करतांना सांगतो.—

' जोहार मायबाप, ऐका वचन । माणकोजी पाटलानें पाठविले होन ।

मग चौगुल्यापासीं देऊन । जगज्जीवन परतले ४॥

.........................................................................

चौगुले काय बोलती वचन । तुम्ही महाराहातें पाठविले होन ।

ते आम्ही सत्वरी घेऊन । पोतें पाठविले राजद्वारीं ॥७॥

ह्यावरून गांवचें वसूल-पोतें दिवाणांत पोंचविण्याचें काम चौगुल्याचें आहे हें निदर्शनास येतें. धनगरी ओंव्यांत म्हटलें आहे–

'गांवामंदी गेलाया र । यालोयाली फीरला । गांव आंधळा झालायार र ॥ तिघ जण डोळस । लिंगुशा बा पाटील । जगतापा चौगुला । दत्तो मंग कुलकर्णी गा तिघ जण डोळस गा ॥ श. १८३६ इ. वृ. पृ. १३५. जरा सोंच लावन दुसऱ्या एका गाण्यांत आलें आहे.—

'चौगुल्याच्या लेकी नको बोलून चढईरु ।

कागदाचा भारा तुझ्या बापाच्या डोईवरु ॥'

येणेंप्रमाणें चौगुल्यासंबंधींचे कांहीं उल्लेख एकत्र करून येथें मांडले आहेत.

वर पृ. ४०, ४५ मध्यें चौगुल्याचा उल्लेखक्रम व त्याची निशाणी ह्या आधारानें चौगुला हा बलुतेदार नाहीं हें सांगितलें. पण त्याचसाठीं आणखी एक तशीच खूण सामान्यतः अशी सांगितल्यास चालेल कीं, बलुतेदार हे एका गांवापुरते असतात व अधिक गांवाला अनुलक्षून असले तरी त्याच्या जातीपुरतेच ओळखले जाण्याची त्यांची संज्ञा असते. न्हावी, न्हावी-मेहेतर; माळी, माळी-मेहेतर; तेली, तेली-मेहेतर इ. इ. मेहेतर म्ह० त्या ज्ञातींतील प्रमुख परंतु, कुलकर्णी, चौगुला, पांडे इ. ह्या नांवामागें देश हें पद जोडून देशकुळकर्णी, देशचौगुला, देशपांडे ह्या जशा प्रांत किंवा देशकारभारांच्या दृष्टीनें वरच्या संज्ञा बनतात तशी गोष्ट बलुतेदारांची नाहीं. बलुतेदारांतील एखाद्यास देश हें उपपद प्रसंगीं लागलें तरी त्याचा अर्थ तत्प्रांतस्थ पण जातीपुरतांच तो प्रमुख असा घ्यावयाचा. त्याच्या गांवाप्रमाणें त्याला प्रांतकारभारांत प्रांतीय स्थान नाहीं.

शेवटीं एक गोष्ट सांगणें अवश्य वाटतें कीं, वर चौगुल्यासंबंधींचेच तेवढे उल्लेख येथें एकत्र करून मांडावयाचे असल्यामुळें हे उल्लेख ज्या पत्रप्रकारांतील होते तो पत्रप्रकारहि येथें संख्याबाहुल्यानें दर्शित झाला; व यावरून असें वाटणें साहजिक

आहे कीं, ज्या अर्थी इतकीं पत्रें हा उल्लेख असलेलीं येथें दिलीं आहेत त्या अर्थी त्यातल्या प्रत्येक पत्रांत चौगुल्याचा निर्देश हा असावयाचाच. पण असें नाहीं. हा पत्रप्रकार म्हणजे महजर, समापत्र, गोतपत्र. इ. अशा पत्रांतून उपस्थित समासद म्हणून वा गोहीदार म्हणून जे गांवकरी व गांवकामगार निर्दिष्ट असतात त्यांत चौगुला असतोच असें नाहीं. शि. च. सा. १ ले. ३१ ह्या महजरांत १७५ नांवें असल्याचें सांगितलें आहे. पण ह्यांतील १८ प्रकारच्या नांवांत चौगुला नाहीं, असेंच सं. २० ले. ५४; पे. द. ३१ ले. १११ इ. इ.

मग कांहीं महजर-पत्रांत चौगुला निर्दिष्ट नाहीं, तो कां ? तर त्याविषयीं असें सुचविल्यास चालेल कीं, कांहीं गांवांत चौगुल्याची गतकुळी झाली किंवा अन्य कारणानें चौगुल्याचें काम पाटीलच करूं लागला म्हणून चौगुल्याचा स्वतंत्र उल्लेख कमी आढळूं लागला. गांवांत राज्यसत्ता जेव्हां अधिकाधिक प्रमाणांत आपला हात शिरकवूं लागली, देशकारभाराची जागा जेव्हां राज्यकारभार आक्रमूं लागला; खेडे-गांवांतील ग्रामसत्ता जेव्हां इतर शेजारच्या मोठ्या नगराशीं अधिक प्रमाणांत संबंधित होऊं लागली म्हणजेच देशांतील त्या सत्तेचें केंद्रीकरण विकासक्रमें करून जेव्हां होऊं लागलें तेव्हां गांवांतील अशा कांहीं कामगार संस्था लोप पावूं लागल्या. अथवा दुसऱ्या कामगारांत अंतर्भूत होऊं लागल्या किंवा त्याहून हलकें काम करून पोटगुजारा करूं लागल्या. त्याचा परिणाम एक असा कीं, कांहीं चौगुले-घराणीं सोयरसंबंधाच्या वेळीं आपला चौगुला हुद्दा सांगत नाहींत व गांवगाड्यांतील उल्लेख अशा पडत्या काळांतील आहे. पण मूलतः चौगुला हा पेशा पाटला बरोबरीचा, खजिनदार, वा जमीन मोजणी करणारा, दिव्य पहाणारा, असा प्रतिष्ठित आहे.

# 8 Some Notes on the Invention of Spectacles and the History of Spectacles in India between A. D. 1500 and 1800.

BY

P. K. GODE, M. A.

*Curator,*

Bhandarkar Oriental Research Institute, Poona 4.

---

Recently a friend of mine, who is interested in the cultural history of India, pressed me to write an article on the introduction of *spectacles* into India. I promised him to study this problem with a view to clearing up some wild notions about this problem which prevail even among learned men in this country, some of whom believe that our ancestors used some sort of spectacles to get over the deficiencies of eye-sight. In my search for facts bearing on the history of spectacles in India I began to study their history in foreign sources to enable me to give the proper historical perspective to the subject of my study as the use of spectacles is now current in all civilized nations of today. The reading habit of the average educated man in these nations has received added benefit from the use of spectacles, and last but not least the use of spectacles has enriched the eye-specialists, no less than their brothers viz. the manufacturers of spectacles and the sellers of spectacles. In spite of the acknowledged benefit from the use of spectacles, a poor man in this country tries to postpone his visit to the eye-specialist and the optician as long as possible, as he cannot afford to pay their heavy charges. This is a sorry spectacle indeed !

Let me now begin my narration about the history of spectacles in general and of their history in India in particular :—

(1) In the *Shorter Oxford English Dictionary* (p. 1962) the word "*Spectacle*" is explained to mean "A device for assisting defective eye-sight or for protecting the eyes from dust, light, etc. consisting of two glass lenses set in a frame which is supported on the nose and frequently kept in place by 'legs' passing over the ears."

The usages of this word and its derivations as recorded in this Dictionary are as follows :—

A. D. 1640—"Reading much, yet never used spectacles or other help.
I this evening did buy me a pair of green spectacles."—Pepys [1].

A. D. 1607—"*Spectacled*"—Provided with or wearing *Spectacles*.

It would appear from the above references that the use of spectacles had become current in England some time before A. D. 1600.

(2) In the *Supplementary Calendar of Documents in the India Office* (A. D. 1600—1640) by Sir William Foster, London, 1928, we find many documents which specify the goods imported by the East India Company into India since the grant of the charter to the Company by Queen Elizabeth on *31st December 1600*. From *Document No. 259* dated

---

1 In the *Reader's Hand-book* by E. C. Brewer, London, 1911, p. 824, we get the following note on *Pepys's Diary* :—

"Pepys died in 1703, but his *Diary* was not published till 1825. It is in short-hand, and is a record of his personal doings and sayings from *January 1600* to *May 1679*."

Brewer in his *Dictionary of Phrase and Fable* (London, 1912) refers to a device of Thackeray in drawings made by him (p. 1165). In *Punch*, Vol. XX. No. 495, p. 8 is a butcher's boy chalking up "No Popery" and the *tray* forms *a pair of Spectacles*, showing it was designed by Thackeray.

23rd February 1616 we learn that *William Biddulph* was appointed by the Company to be the Chief of their factories at Agra and Ajmer. Ajmere was seat of the court at this time. In *Document No. 330* dated *22nd September 1616* addressed to Biddulph by Kerridge, Barker and Mittford at Surat, Biddulph is advised to consult *Asaf Khan* as to the goods most likely to be in demand at the court, because Biddulph had reported in three earlier letters "the slow sale of their *glass-ware*, strong waters, **Spectacles**, *prospective glasses* etc. and depricated any further supply by reason of a Venetians Store sold to Alsoph Chan (Asaf Khan)."

It is clear from the above document that *Spectacles were introduced by the agents of the East India Company into Rajaputana* as early as A.D. 1616 within 16 years since the grant of the charter to this Company by Queen Elizabeth on *31st December 1600.* It is for Hindi scholars to record any references to spectacles in Hindi literature in Jehangir's time. Some references to spectacles are likely to be found in Persian sources of this period and I trust that scholars conversant with these sources will record them, if they feel interested in the subject of the present study.

(3) Before I record references to the use of Spectacles in Sanskrit and Marathi sources both before and after A. D. 1600, I would like to invite the attention of my readers to the following remarks of Dr. Albert Neuburger on pp. 163-164 of his "*Technical Arts and Sciences of the Ancients*" (Eng. Trans. by H. L. Brose, Methuen & Co., London, 1929):—

In his account of the Glass-work of the Romans Neuburger observes:—

"*Spectacles were not known in antiquity*; indeed, the effects of concave and convex glass lenses had not apparently been observed or they were not made use of. The only report derived from antiquity concerning the use

properties resembled those of a *glass lens, which instrument may possibly have been known to the Hindus* at the time when this play *was written*. The following parallel sentiment is from *Bhartṛhari* ii, 30:—

" यदचेतनोऽपि पादैः स्पृष्टः प्रज्वलति सवितुरिनकान्तः ।
तत्तेजस्वी पुरुषः परकृत-निकृतं कथं सहते ॥ "

(Translation:—"Since even the lifeless (stone) beloved of the sun, when touched by its rays, burns; how then can the man of spirit put up with an injury inflicted by another?")

We may compare the use of the sunstone[1] *for concentrating sun's rays* (to a burning heat) to the use of "*glass globes filled with water*" used by Roman and Greek shoe-makers for *concentrating the lamp-light.*

In the *Aṣṭāṅgahṛdaya* of Vāgbhaṭa II (8th or 9th century A. D.) verse 42 of Chapter 30 of *sūtrasthāna* refers to सूर्यकांत:—

" त्वग्दाहोवर्तिगोदन्त**सूर्यकान्त**शरादिभिः । "

Here सूर्यकांत is mentioned as a means for producing त्वग्दाह or heating of the skin for therapeutic purposes. Hemādri explains सूर्यकांत as स्फटिक.[2]

---

1. I may note here the following verses about the *Sūryakānta* and *Somakānta* stones recorded in सुभाषितरत्नभाण्डागार (N. S. Press, Bombay, 1911, page 228) compiled by K. P. Parab:—

" सोमकान्तो मणिः स्वच्छः सूर्यकान्तस्तथा न किम् ।
उद्गारे तु विशेषोऽस्ति तयोरमृतवह्नयः ॥ ६६ ॥
सुधाकरकरस्पर्शाद्बहिर्द्रवति सर्वतः ।
चंद्रकान्तमणेस्तेन मृदुत्वं लोकविश्रुतम् ॥ ६७ ॥ "

सूर्यकांत is called "आग्नेयग्रावा" (Fire-stone) in the following lines on p. 82:—

" मयूखैरश्रान्तं तपति यदि देवो दिनकरः ।
किमाग्नेयग्रावा निकृत इव तेजांसि वमति ॥ २० ॥"

2. Hemacandra in his *Abhidhāna-Cintāmaṇi* refers to सूर्यकांत in the भूमिकाण्ड (Verse 133–"सूर्यकान्तः सूर्यमणिः सूर्याश्मा दहनोपलः) He mentions the following classification of स्फटिक according to वाचस्पति:—

strongly hope that some scholar will undertake a quest for the *Sūrya-Kānta* with a view to correlating the literary evidence about it with the archæological evidence, if any, based on an examination of the ancient crystal beads spherical or otherwise.

(5) I have already recorded evidence to prove the importation and sale of foreign spectacles at Ajmer in Rajputana in *A. D. 1616*, by the agents of the East India Company. Let us now see if *Spectacles* were introduced into India *prior to A. D. 1616*. In this connection I record the following evidence which clearly proves the use of spectacles at Vijayanagar 100 years earlier than A. D. 1616, when foreign spectacles were sold at Ajmer :—

Somanātha Kavi was a contemporary of *Vyāsarāya* the great Madhva pontiff (A. D. 1446–1539). Somanātha composed a biography of Vyāsarāya called the *Vyāsayogi-Carita* (edited by B. Venkoba Rao, M. A. Bangalore, 1926). In his very learned and critical Introduction, (p. CXX) Mr. Venkoba Rao refers to the use of " उपलोचनगोलक " by Vyāsarāya for reading a manuscript about *A. D.* 1520 :—

" When at the time of the *abhiṣeka* in *about 1520 A. D.*, as will be shown later, Śrī Vyāsarāya entered Śrī Kṛṣṇadevarāya's court he was an old man. He must have been 74 then. Somanātha describes that Śrī Vyāsarāya then was looking at the lines of a book and wore spectacles, from which great age could be inferred, meaning that otherwise he was strong for his age :—

" करकमलमधुपश्रेणिकायामिव पुस्तकविभागरेखायां निभृतनिक्षिप्तचक्षुषं नासिकानालभागप्रतिफलितेनेव नयनयुगलेन स्वच्छतरोपलोचनगोलकेन अनुमितवार्धकदशातिशयं ॥ "

(See p. 72 of *Vyāsayogicarita*)[1].

---

1. I am very much indebted to my friend and neighbour Mr. S. T. Papu, B. A. for drawing my attention to the reference to the use of उपलोचन by Vyāsarāya and take this opportunity of thanking him for his great interest in this problem.

In the above Sanskrit passage we have the earliest mention of the use of *Spectacles* at Vijayanagar Court about *A. D. 1520*. The term उपलोचन गोलक is a very happy coinage to describe "Spectacles" with convex eye-glasses. There is no word for "*Spectacles*" in Sanskrit as spectacles as such were unknown in India prior to the Portuguese contact. We can postulate this tentative conclusion till some scholar points out a reference to the use of "Spectacles" prior to say A. D. 1400.

As regards the question about the source of the spectacles ( उपलोचन-गोलक ) used by Vyāsarāya about *A. D. 1520* I may suggest that they were perhaps presented to this influential pontiff by the Portuguese along with numerous other presents which are referred to by Somanātha in the following extract on p. 65 of the व्यासयोगिचरित ( See p. LXVI of Venkoba Rao's Introduction):

> "59. The Portuguese knew Śrī Vyāsarāya very well. Their ambassadors and principal men appeared before Śrī Vyāsarāya with presents many times."

" द्वीपांतरभूपालसंप्रेषितप्रधानपुरुषैरसकृत् समर्प्यमाणानि बहुविधोपहारपूजनानि " (p. 65.)

In view of the above direct contact of Vyāsarāya with the Portuguese, we may be justified in presuming that the spectacles used by Vyāsarāya were imported into India by the Portuguese about A. D. 1520, if not a few years earlier.

(6) We are now in a position to consider the origin and history of spectacles in Europe as recorded in the *Encyclopædia Britannica* ( 14th Edition, Vol. 13, p. 920 ) The following points from this account are note-worthy :—

( i ) Pliny and others refer to glass spheres filled with water, used as burning glasses.

(ii) E. Wilde (*Geschichte der Optik*, 1838–43) denies all knowledge of spectacle lenses to the ancients.

(iii) The first authentic mention of *lenses* is that by *Meissner* (*A. D. 1260–80*) who expressly states that *old people derive advantage from spectacles.*

(iv) Nicolas Bullet, a priest, in *A. D. 1282* used spectacles in signing an agreement.

(v) The first picture in which spectacles are shown is of A. D. 1360 in Church of San Nicolo in Treviso.

(vi) In a Sermon on *23rd February, 1305* Giordino da Rivalto stated that "*it was only twenty years since the art of making spectacles was discovered.*"

(vii) The use of spectacles dates from *a little prior to A. D. 1280.*

(viii) Processes of making lenses were in use about *A. D. 1585.*

If spectacles originated about A. D. 1250 in Europe and were in use there since this time, we can easily account for the use of spectacles by Vyāsarāya at Vijayanagar about A. D. 1520 as he was in contact with the Portuguese, who must have presented these spectacles to this guru of Kṛṣṇadevarāya as a novelty from Europe.

(7) I have already recorded evidence to prove the sale of foreign "spectacles" at Ajmer in *A. D.* 1616 and the use of "*Upalocana-golaka* (spectacles) at Vijayanagar *about A. D.* 1520. I shall now record some evidence from the Marathi literature to prove the use of spectacles in the Deccan in the 17th Century.

At present the name चाळशी is current for "spectacles" in the Marathi language. In the Marathi Dictionary viz.

*Śabdakośa* (by Date and Karve, p. 1180) this word is explained as follows :—

चाळशी-सी, चाळिशी-सी—(1) Weakness of eyesight developed at the age of forty.
(2) Age of 40 years.
(3) चष्मा or spectacles.

*Usage* :—Saint Rāmadāsa (A. D. 1608-1682) refers[1] to चाळसी in his *Dāsabodha, Daśaka* 3, *Samāsa* 6 as follows :—

" नेत्रीं होति रांजणवाडिया।
चाळसी लागे प्राणिया।
या नांव आध्यात्मिक ॥ ४९ ॥ "

We have no means of knowing what kinds of spectacles (or चाळसी) were known to Saint Rāmadāsa in the 17th Century. Elsewhere in the *Dāsabodha* i. e. in his section on लेखनक्रियानिरूपण (*Daśaka* 19, Samāsa 1)[2] he instructs us to write manuscripts in *middle-sized* characters because manuscripts written in *very* small characters in one's youth will be of no use to one, in oldage (owing to weak eye-sight developed with the advance of years).

If spectacles were available in Rāmadāsa's time, why should he ask us to write in middle-sized characters? Perhaps the spectacles of his age were not of the perfect variety to suit all kinds of short sight.

(8) Corresponding to the expression "उपलोचनगोलक" (spectacles) used by Somanātha Kavi about A. D. 1520 we have the term "उपनेत्र" now current in the Deccan. This term for "spectacles" was also current in the 17th and 18th Centuries as will be seen from the following quotations recorded in the *Śabdakośa* (p. 392) :—

---

1 See p. 49 of रामदास समग्रग्रंथ, Poona, 1906.

2 Ibid, p. 291—

" बहु बारीक तरुणपणीं।
कामा नये म्हातारपणीं।
मध्यम लिहिण्याची करणी। केली पाहिजे ॥ १० ॥ "

The Marathi poet *Vāmanapaṇḍita* ( A. D. 1636–1695 ) states that "*the spectacles can see what the eyes cannot see*"

" जें न देखती नेत्र । तें देखती उपनेत्र "
— ( यथार्थदीपिका ४. ३३२ )

Another Marathi poet *Moropant* ( A. D. 1729–1794 ) refers to उपनेत्र ( spectacles ) in the following line :—

" होय भला दृष्टार्थप्रद उपनेत्रांचि कीं भला बुचळें । "
— उद्योगपर्व ३, १३.

In our search for the history of *spectacles* in India we have recorded references between A. D. 1500 and 1800. Any scholar can supplement these references by recording more references from the sources studied by him.

(9) In a recent book "Feathers and Stones" by Pattabhi Sitaramayya (Padma Publications, Bombay, 1946) the following remarks[1] about *spectacles* are recorded :—

"Rolled-gold spectacles and multi-coloured vulcanite or ebonite frames are the modern reminders of *Presbyopia* and also *Myopia*, and not seldom of modern artistic taste claimed by the eyes and the nose and through them the face. But *Presbyopia* is as ancient as man. Our elders had excellent pebbles cut into double convex lenses to serve the long sight that people generally suffer from after forty. In Maharashtra it is known as *Chaleesi* (40) and the Uria *Chalesa* (40). In Gujarati it is known as '*Betalan*' (42) and in Andhra *Chatwar* (4th decade)."

Though *Presbyopia*[2] or *Myopia*[3] may be as ancient as man it is doubtful whether in the history of any country of

---

1 I am thankful to Mr. S. N. Savadi, B.A. (Hons.), my Senior Cataloguing Assistant at the B. O. R. Institute, for drawing my attention to these remarks.

2 *Presbyopia*: Long-sightedness due to old age.

3 *Myopia*: Short-sightedness.

